या आचार्यांच्या दुसऱ्या उक्तीप्रमाणें—बालपणांत खेळांत रमलेला; तारुण्यांत विषय उपभोगांत आसक्त, तर वृद्धपणीं निरनिराळ्या चिंतांनीं व्यग्र झालेला, असेंच बहुतांचें आयुष्य जात असतें. मात्र केव्हां केव्हां वैयक्तिक जीवनांत एखाद्या जिवलग आप्त-स्नेह्याचा मृत्यूनें वियोग झाला; किंवा असाध्य व दुर्धर रोगानें स्वतःचें शरीर पछाडलें गेल्यानें दिवसानुदिवस, महिनेच्या महिने, वर्षानुवर्षें असह्य हाल व वेदना सहन कराव्या लागल्या किंवा एखादी आर्थिक आपत्ती येऊन आभाळच कोसळल्याचा भयंकर प्रसंग आला; किंवा राष्ट्रीय अगर सामाजिक जीवनांत प्लेगासारखा कहर उसळून, अगर कांहीं वर्षांपूर्वी बिहार प्रांतांत जसा भूकंपाचा आघात झाला तसा होऊन, हृदयद्रावक जीवित व वित्तहानी झाली म्हणजे मात्र माणसांना धक्का बसल्यासारखें होऊन तीं खडबडून जागीं होतात; व मग देवा, हा सर्व खटाटोप व व्याप कशाकरितां; हा जीवनकलह, हीं सुखदुःखें, हे हाल, या आपत्ती, हा कहर, कशाकरितां, यांचा अर्थ काय, असे उद्‌गार त्यांचे मुखांतून निघून जातात. पण ही त्यांचे मनाची स्थिती तात्पुरती व तावत्कालाचीच असते. ज्या प्रमाणें पाण्याचे प्रवाहावर जोरानें काठी मारली असतां, तावत्काल मात्र तो प्रवाह दुभंग होतो, पण काठी बाहेर काढून घेतल्याबरोबर तो प्रवाह पूर्ववत् संथपणें वाहूं लागतो. त्याप्रमाणेंच ती ती आपत्ती नाहींशी झाली, कीं पुनः माणसांचे पूर्वव्याप पूर्ववत् चालूं लागतात. वस्तुतः असें होतां कामा नये. यावेळीं जागृत झालेले विचार तसेच पुढें चालवून ज्याचा त्यानें शांतपणें आपल्याशीं विचार करून, निदान आपल्यापुरता तरी, वरील प्रश्नांचा निर्णय निश्चित करून ठेविला पाहिजे. तद्विषयक ग्रंथ पाहिले पाहिजेत. याप्रमाणें निश्चिती झाल्यावर सुद्धां, माणसांचे हातून विचारानुरूप वर्तन होत नाहीं. तर मग विचाराच्या, निश्चितीच्या अभावीं

तर, अनुरूप वर्तन शक्यच नाहीं. म्हणून जीवनाचा कांहीं हेतु आहे कीं नाहीं,- असल्यास कोणता, हा विषय अत्यंत महत्वाचा आहे. यासंबंधीं जर ज्याचा त्यानें आपला विचार – निर्णय दृढ केला, तर त्याच्या मतानें जीवनाचा हेतु जो ठरेल, तो साध्य होण्याकरितां त्याचे हातून कांहीं तरी प्रयत्न होणें शक्य आहे व अंतच खरोखरी त्याचें मताप्रमाणें त्याचे जीवनाची पूर्तता होईल.

आरंभीं दिलेल्या आचार्यांच्या वचनांत **जीवनाच्या प्रवाहित्वाची, गतिमत्वाची जी कल्पना आहे,** अशीच कल्पना पुष्कळ विद्वानांची व साधुसंतांची आहे. जगत् या शब्दाची रचना सुद्धां हेंच गतिमान दर्शविते. पण प्रत्येक विद्वानाच्या व साधुसंताच्या कल्पनेंत विचाराचा दृष्टीकोण व भूमिका नवीन व कमी अधिक पूर्णतेची असल्यामुळें, प्रस्तुत विषयाचे अध्ययनास त्या प्रत्येकांचीं वचनें जास्त जास्त सहायक होतात.

इंग्लंडांतील प्रसिद्ध ग्रंथकर्ता जोसेफ ॲडिसन यानें एक Vision of Mirza (मिर्झाचे जागृत–स्वप्न) नांवाचें सुंदर गद्यकाव्य लिहिलें आहे. त्या काव्यांत मिर्झा या नांवाचा मनुष्य एका डोंगराचे शिखरावर बसला असतां, त्याचे जवळ एक देव आला व त्यानें त्यास बोटानें खूण करून समोर बघण्यास सांगितलें व काय दिसतें म्हणून विचारलें, तेव्हां त्या मिर्झाला एक नदी एका दरींतून निघून कांहीं अंतरापर्यंत त्यांचे समोर वहात वहात दुसऱ्या टोकानें, दुसऱ्या एका दरींत गुप्त झालेली दिसली. त्यांचे समोर अलिकडील तीरावरून पलिकडचे तीरावर जाण्याकरितां पूल असलेला दिसला व त्या पुलावरून पुष्कळ लोक पलिकडचे तीराकडे जातांना दिसले. पण बहुतेक जण असे जात असतांना, कोणी पाहिल्याच, तर कोणी पांचव्या, पंचविसाव्या, पन्नासाव्या, अशा कोणत्याना कोणत्या तरी पायऱ्यावरील छिद्रांवर पाय घसरून खालीं नदींत पडून प्रवाहाला लागत आहेत

असें दिसलें. याचा अर्थ काय, म्हणून मिर्झानें विचारलें असतां त्या देवानें हा जीवन प्रवाह आहे व त्यांत निरनिराळया वयोमानांत माणसें मरून कालवश होत आहेत असें सांगितलें. **पण या प्रवाहाचा उगम कोठें व अंत कोठें असें** विचारलें असतां त्यानें दोन टोंकांच्या दऱ्यांकडे बोट दाखवून तें अज्ञात आहे असें दर्शविलें व तो गुप्त झाला. हे मिर्झाला दिसलेलें जागृत-स्वप्न गूढ अर्थानें भरलेलें आहे. व तें वाचून भदवद्गीतेंतील

'अव्यक्तादीनि भूतानि । व्यक्त मध्यानि भारत ।
अव्यक्त निधनान्येव ।'

या वचनाची आठवण होते. भूतमात्रांची जन्मापूर्वी काय स्थिती व मरणोत्तर काय स्थिती हें अव्यक्त व गूढ आहे. हें दृष्टीआड आहे. या जीवन प्रवाहाचा उगम कोठें व हा जीवन प्रवाह जातो कोठें हें कळत नाहीं. जन्मापासून मृत्यूपर्यंतचा मधला प्रवाह मात्र दृष्टिगोचर आहे व याच वेळीं हे प्रश्न मनांत उभे राहातात, कीं या **जन्मापासून मृत्यूपर्यंतचे कालांतील मानवाचे जीवनाचें अवलोकन, निरीक्षण, व प्रयोग या मार्गानें, या जीवनाचे कोड्याचा उलगडा होणें शक्य आहे काय? जन्माचे पूर्वी व मृत्यूनंतर जीवनाचें अस्तित्व शक्य आहे काय?** असल्यास त्या जीवन स्वरूपाचे ज्ञान माणसांस यांचें निरीक्षण व प्रयोग या संशोधनाच्या आधुनिक कालांतील सर्वसंमत साधनांनीं होणें शक्य आहे काय? असा उलगडा पूर्वाचार्यांनीं अगर आधुनिक पंडितांनीं केला आहे काय? असल्यास तो कोणता आहे?

**श्री समर्थ रामदास स्वामींनीं** त्यांच्या सुप्रसिद्ध 'दासबोध' ग्रंथांत अकराव्या दशकाच्या सातव्या समासांत **मानव जीवनाचें वर्णन** करतांना हेंच नदीचें रूपक पण वरील लेखकापेक्षां जास्त सुंदर रीतीनें व सूचक शद्बांनीं रंगविलें आहे. ते म्हणतात :

चंचळ नदी गुप्त गंगा । स्मरणें पावन करी जगा ।
केवळ अचंचळीं निर्माण झाली । अधोमुखें बळें चालली ।
अखंड वाहे परि देखिली । नाहीं कोणी ॥

या संसार नदींतही सामान्य नदीप्रमाणें लाटा, तरंग, फेस, वळणें, खडक. व भोंवरे असतात; व या नदींतून जातांना जीं अज्ञ दुर्बळ माणसें असतात त्यांचें ते वर्णन करतात.

येक ते वाहतचि गेले । येक वळशामध्यें पडले ।
येक साकडींत आडकले । अधोमुख ॥ ८ ॥
येक आपट आपटोंचि गेलीं । येक चिरडचिरडोंचि मेलीं ।
किती येक ते फुगली । पाणी भरलें ॥ ९ ॥

मग समर्थ म्हणतात

येक बळाचे निवडले । ते पोहोताचि उगमासि गेले ।
उगम दर्शनें पवित्र झाले तीर्थरूप ॥ १० ॥

जीं माणसें अज्ञ, दुर्बल आहेत, तीं या भवनदीच्या धारेला लागून कोणी हापटत हापटत जातात, कोणी चिरडून मरतात; कोणी एखाद्या कपारींत अडकून पाण्यानें फुगतात. पण जे ज्ञानानें व सामर्थ्यानें अन्वित असतात तीं निवडक माणसें (The Elect Humanity) आपल्या बाहुबलानें या भवनदीच्या उगमापर्यंत पोहत जातात व त्या उगमाच्या दर्शनानें पवित्र होतात. तेथें ते म्हणतात.

ब्रह्मादिकांचीं भुवनें । ब्रह्मांड देवतांचीं स्थानें ।

त्या ठिकाणीं त्यांना, ज्यांचे स्वाधीन या आपल्या ब्रह्मांडाची (Solar System) व्यवस्थासूत्रें आहेत, त्यांचें दर्शन होतें. त्यांचा सहवास घडतो

व त्या दर्शन–सहवासानें त्या व्यवस्थेच्या रहस्याचें ज्ञान होतें. हें ज्ञान दुसऱ्यांना देण्यांत ते आपलें आयुष्य व्यतीत करतात.

**महानदी परी अंतराळीं । प्रत्यक्ष वाहे सर्व काळीं ।**
**स्वर्गे मृत्युपाताळीं । पसरली पहा ॥ २३ ॥**

तेव्हां **'मर्त्येन अमृतं ईप्सति'** या ऐतरेयब्राह्मणांतील वचनाप्रमाणें आपण या लेखामध्यें या भवनदीच्या दृश्य भागाचे—**जन्म मृत्यूंच्या दरम्यानच्या दृश्य भागाचें—निरीक्षण व प्रयोग** (Observation and experiment) **या आधुनिक सर्वसंमत साधनांनीं, अवलोकन करून अदृश्य भागाच्या स्वरूपाचें** कांहीं ज्ञान **संपादन करूं शकतों किंवा नाहीं हें पहाणार आहों.**

**या संबंधीं निरनिराळ्या लोकांचे विचार पाहिले** तर, ते **मुख्यतः चार प्रकारचे आहेत असें आपणांस आढळून येईल.**

आतां या चार विचारपद्धतीचें आपण अनुक्रमानें परीक्षण करूं. म्हणजे या चार पद्धतींचें गुणदोष आपणांस कळून सर्वांत अधिक निर्दोष व अतएव ग्राह्य पद्धती कोणती हें समजून येईल. अर्थात सर्वांत जी जास्त स्थूल साधी व सदोष पद्धती आहे तिचा प्रथम विचार करूं.

**पहिली** व व्यवहारांत आपणांस जी नेहमीं कानावर पडते ती **सामान्य व्यवहारी लोकांची विचार पद्धती.** हीं माणसें विशेष विद्यासंपन्न अगर खोल विचाराचीं नसतात. पण तीं आपणा स्वतःला जगांतील विद्वानांपेक्षां किंबहुना ऋषी-मुनी, साधु-संतांपेक्षां जास्त तारतम्याचीं म्हणून जास्त शहाणीं असें समजतात. यांच्या मतानें सृष्टीला अगर जीवनाला कांहींच अर्थ नाहीं. त्यांच्या मतें या प्रश्नाचा उलगडा आजपर्यंत कधीं

कोणाला झाला नाहीं. व यापुढें कधीं कोणाला होणार नाहीं. या प्रश्नाचा विचार करीत बसणें म्हणजे काथ्याकूट करीत बसण्याप्रमाणें व्यर्थ कालक्षेप आहे. काथ्या कितीही कुटला तरी त्याची ज्याप्रमाणें पूड होणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें या प्रश्नाचा उलगडा होणें कधींही शक्य नाहीं. म्हणून त्यांचा उपदेश असा कीं, Eat, drink and be merry ; भूक लागली म्हणजे खावें; तहान लागली म्हणजे प्यावें; व आनंदानें राहून मजा करावी, याचा स्पष्ट अर्थ आहे. दिव्याचा हेतु काय असें विचारलें असतां, हीं माणसें म्हणणार, तेल कमी झाल्यास दिव्यांत तेल घालावें, वात कमी पडल्यास नवीन वात घालावी. पण हें करणें म्हणजे दीपाचा हेतु काय हें सांगणें नाहीं. हें या माणसांच्या लक्षांत येत नाहीं. यांचे हें उत्तर ऐकलें म्हणजे डॉ. गोल्डस्मिथच्या (Vicar of Wakefield) कादंबरींतील त्या गमती इब्राहिम जेन्किन्सनची आठवण होते. तो आपल्या नाकावर सोन्याच्या फ्रेमीचा चष्मा चढवून विद्वत्तेचा आव आणून झोकांत म्हणतो :—"The world is in its dotage ; & yet the Cosmogony or the creator of the world has puzzled the philosophers of many ages"

**हें विश्व निर्माण होऊन युगांचीं युगें होऊन गेलीं. विश्व हें आतां वार्धक्याप्रत येऊन पोंचलें आहे. पण तें कसें व कां निर्माण झालें हें युगा-युगांतरीं होऊन गेलेल्या तत्वज्ञान्यांना सुद्धां अजून न उलगडलेलें असें एक कोडें होऊन राहिलें आहे.** याप्रमाणें ही सामान्य व्यवहारी जनांची विचारपद्धती आहे. अर्थात ते कोणताच उलगडा सांगत नाहींत.

या पुढची दुसरी विचार पद्धती म्हणजे, हल्लींच्या काळांतील, उच्च ज्ञानाचें केंद्र म्हणून समजले जाणाऱ्या युरोपांतील कित्येक विद्वान

तत्वज्ञान्यांची व शास्त्रज्ञांची होय. त्यांचेपैकीं कित्येक अज्ञेयवादी (agnostic) कित्येक प्रत्यक्षवादी (positivist or realist), तर कित्येक पुरे पुरे जडवादी (materialist) असे आहेत. मानवांस इंद्रियें व बुद्धी या रूपानें अवलोकनाची व ज्ञानाचीं जीं साधनें उपलब्ध आहेत, त्यांचे सहायानें हा 'जीवन हेतु' चा प्रश्न सुट-ण्यासारखा नाहीं असें अज्ञेयवाद्यांचें (agnostics) म्हणणें आहे. यांचे प्रमुख टॉमस हक्स्ले होते. Agnostic या शब्दाची योजनाहि त्यांनींच प्रथम केली. त्याचा अर्थच असा कीं Gnosis [ संस्कृतांतील ज्ञान शब्दाचा ग्रीक भाषेंतील अपभ्रंश अगर रूपांतर ] या नांवानें प्राचीन ग्रीक लोकांत सूचित केले जाणारें अदृश्य सृष्टीचें ज्ञान ज्यांना मान्य नाहीं ते a-gnostic होत.

याशिवाय दुसरे कांहीं विद्वान भौतिक शास्त्रज्ञ तर माणसाचें शरीर काय किंवा एकंदर जग काय, हें एक यंत्र आहे; निर्जीव यंत्रा-प्रमाणें याचे पाठीशीं मन किंवा चैतन्य म्हणून कांहीं ज्ञानस्वरूपी वस्तु आहे अशी वस्तुस्थिती नाहीं, अर्थात् अशा निर्जीव वस्तूचे मागें कांहीं हेतु असणेंच शक्य नाहीं, असें म्हणणारे आहेत. माण-साचे शरीराची हालचाल म्हणजे 'Horologetic movement of a clock' 'घड्याळाचें यांत्रिक हलनवलनाप्रमाणें' होय. कार्ले व्हॉगट हा जर्मन शास्त्रज्ञ म्हणत असे कीं, 'Thought is the secretion of brain as bile is the secretion of liver.' 'ज्याप्रमाणें पित्तरस हा यकृत पिंडांचा स्राव आहे, त्याप्रमाणें माणसाचे विचार हे त्याच्या मेंदूचा स्राव आहेत' हे विचार वाचून आपल्या हिंदुस्था-नांतील चार्वाकाचे 'किण्वादिभ्यो समेतोभ्यः चैतन्यं मदशक्तिवत्'

म्हणजे 'माणसाचे देहामधून व्यक्त होणारें चैतन्य, हें ताडी वगैरे वनस्पती ऐके ठिकाणीं करून सेवन केल्यानें अंगांत येणाऱ्या उन्मादाप्रमाणें आहे' हें वचन आठवेल. पण या लोकांना यंत्राची अगर घड्याळाची उपमा देतांना, यंत्र अगर घड्याळ आपोआप उत्पन्न होत नाहीं, त्याचा कर्ता म्हणून कोणी यंत्रकार असतो, यंत्रांत हलनवलन आपोआप उत्पन्न होत नसून त्याची योजना कर्त्याकडून आधींच केलेली असते, यंत्र तयार करण्यांत त्या कर्त्याचा कांहीं एक हेतु असतो; व त्या सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे यंत्र, कर्त्याचे योजनेबाहेर जाऊं शकत नाहीं. यंत्रांत स्वतःची अशी (power of initiative) नवोपक्रम शक्ती कांहींही असूं शकत नाहीं; व ती माणसांत असते. हे विचार या विद्वान पंडिताच्या नजरेंतून अजीबात गेलेले दिसतात. विचार उत्पादनासंबंधीं तर अनेक प्रयोगांनीं असें सिद्ध झालें आहे कीं, मेंदु हा विचारांची नुसती उपाधी (instrument or medium) आहे, उत्पादक अगर उत्पादन स्थान नाहीं. विचाराचें अस्तित्व मेंदूहून अगदीं स्वतंत्र असूं शकतें ही विचारपद्धती प्रो. जेम्स सारख्या नाणावलेल्या मानसशास्त्रज्ञांनाही संमत आहे.

या संबंधीं दोनच प्रयोगांचा उल्लेख पुरेसा आहे. एक विचार संक्रमणाचा (Telepathy or Thought transference) अनेक वेळा असे प्रयोग शास्त्रज्ञांनीं करून पाहिले आहेत कीं, दोन निरनिराळ्या माणसांनीं निरनिराळ्या गांवीं वेळ ठरवून, एकानें विवक्षित विचार करावयाचे, व ते टिपून ठेवायचे, त्याच वेळीं दुसऱ्या माणसानें आपलें मन अगदीं रिकामें करून, मनांत येतील ते विचार नमूद करून ठेवायचे. याप्रमाणें

एकाचे विचार दुसऱ्याचे मनानें ग्रहण केल्याचें अनेकदां आढळून आलें. आतां या ठिकाणीं हें स्पष्ट आहे कीं, एकाचे डोक्यांतून विवक्षित विचार निघाले ते दुसऱ्याचे डोक्यांत (मेंदूंत) प्रवेश करिते झाले. पण मग प्रश्न हा आहे कीं, **एकाचे डोक्यांतून निघाल्या नंतर व दुसऱ्याचे डोक्यांत प्रविष्ट होण्यापूर्वीं अर्थातच विचार कोणत्याही मेंदूंत नव्हते. म्हणजे विचार मेंदूव्यातिरिक्त राहूं शकतात हें सिद्ध झालें.**

**दुसरा प्रयोग, मोहनिद्रेचा** [ Hypnotic trance **चा** ] ( Thought is the secretion of brain ) **विचार हा मेंदूचा एक स्राव आहे,** जसा पित्त हा यकृताचा स्राव आहे, असें म्हणणाराचे विचार असे कीं, जसा मेंदू तसे विचार आढळतात. बालवयांत मेंदू लहान, विचार ही लहान व सामान्य; तारुण्यांत मेंदू जोमदार, तेव्हां विचारही जोमदार असतात. तेच पुनः वार्धक्यांत, मेंदू दुर्बल व क्षीण, तेव्हां विचारही दुर्बल क्षीण. याला उत्तर मोहनिद्रेचे प्रयोगांनीं मिळालें. मोहनिद्रेचे अंमलाखालीं असलेल्या माणसाचें रुधिराभिसरण अत्यंत मंद होतें. त्यामुळें मेंदूला रक्ताचा पुरवठा अत्यंत कमी कमी होत जातो. पुनः श्वासोच्छ्वास क्रियाही अत्यंत मंद होते. तेव्हां रक्ताची शुद्धीकरण क्रियाही मंद होऊन, अशुद्ध रक्तच मेंदूंत फिरत असतें. तेव्हां वरील शास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें विचार अत्यंत क्षीण व दुर्बल झाले पाहिजेत, पण तसें तें न होतां ते विशेष तरल व जोमदार झालेले आढळतात. इतकेंच नव्हे तर त्या विवक्षित माणसांच्या स्मृतीं, तर्क आदि मानसक्रिया जास्त निर्दोष व जोमदार झालेल्या दिसतात. नेहमींच्या प्रकृतीनें. वेड लागलेलीं व उन्मत्त झालेलीं माणसें, शांत होऊन साध्या माणसांप्रमाणें बुद्धिवाद करतांना आढळतात. अर्थात् यावरून त्यांच्या मेंदूंतील, परमाणूंचें आंदोलन हें मोहनिद्रेंतील प्रक्रियेनें जास्त व्यवस्थितपणें चालत राहतें असें दिसतें. **याचा अर्थच असा कीं, मेंदू हा विचाराचा उत्पादक अगर उत्पादनस्थान नसून नुसती उपाधी अथवा माध्यम आहे इतकेंच.**

मानवाचें चैतन्य म्हणजे ताडी सारखीं अनेक द्रव्यें एके ठिकाणीं करून सेवन केलीं असतां उत्पन्न होणाऱ्या उन्मादाप्रमाणें आहे, असें म्हणणाऱ्या चार्वाकाला, आपल्या विचारप्रभावानें मानवानें जें शास्त्रज्ञान कमाविलें आहें, व त्या ज्ञानावर आधारलेली राजकीय, सामाजिक तत्वज्ञानविषयक, वगैरे अनेक क्षेत्रांत जी आश्चर्यकारक संस्कृती उभारली आहे, तिची उत्पत्ती ताडीच्या उन्मादापासून शक्य आहे काय इतकीच पृच्छा बस होईल.

जडवाद्यांचे प्रमुख म्हणजे प्रो. टिंडॉल यांनीं इंग्लंडांतील Association for the Advancement of Science या शास्त्रज्ञांचे परिषदेपुढें अध्यक्षीय भाषण करतांना आपल्या मताचा निष्कर्ष म्हणून पुढील महामंत्र वाक्य सांगितलें. ते म्हणाले, 'In matter, I see the promise and potency of every form of life' 'जडद्रव्यांत, मला सर्व प्रकारच्या जीवनाची बीजशक्ती व शक्यता दिसत आहे.' म्हणजे यच्चयावत् जगाची घटना केवळ एका जडत्वाचे आधारावर झाली आहे व या द्रव्यांतच सर्व तऱ्हेचे जीव निर्माण करण्याची शक्ती आहे.

इंग्लंडांतील दुसरे प्रमुख प्रसिद्ध तत्वज्ञ व त्या काळचे (इ. स. १८०६ ते १८७३) अत्यंत बुद्धिमान गृहस्थ जॉन स्टुअर्ट मिल्ल यांना ग्लॅडस्टन सारखे थोर गृहस्थ Saint of Rationalism म्हणजे 'बुद्धिवादाचें आचार्य' म्हणून बहुमानानें संबोधीत असत. यांचें मत या बाबतींत तर अत्यंत मनोरंजक आहे. हें जग म्हणजे एक 'fortuitous Concourse of atoms' 'परमाणूंचा आकस्मिक रीत्या घडून आलेला संघात' व या असंख्य परमाणूंची नानाविध पदार्थ-

रूपानें घटना व विघटना म्हणजे Blind and unconscious forces ' अंध व अप्रबुद्ध अशा शक्तींची लीळा होय. हा विचार येवढ्या मोठ्या थोर बुद्धि मत्तेच्या माणसाचा, म्हणून काचला म्हणजे नवल वाटतें व मनाला असें वाटूं लागतें कीं, कोणीही पुरुष कितीहि विद्वान् व बुद्धिमान असला तरी त्याचे मनावर त्याचे कालांतील विचाराचें जड दडपण पडलेलें असतें. हें मिल्ल साहेबांचें मत वाचून हिंदुस्थानांतील अणुवादी वैशेषिकांचे मताची ओळख पटेल.

आतां आपण प्रो. टिंडॉळ व मिल्ल यांचे मतांचा विचार करूं. शास्त्रज्ञांच्या एकंदर संशोधनाचा सर्वसंमत व अबाधित असा जर आपणाला कोणता एक निष्कर्ष दिसत असेल, तर तो हा आहे कीं, निसर्गाचें सर्व बाजूनें निरीक्षण केल्यास असें आढळतें कीं, निसर्गांतील प्रक्रियांमध्यें अत्यंत (Law and order म्हणजे) नियमबद्धता व व्यवस्थितपणा आहे. जर कोणत्याही बाबतींत केव्हां पूर्वीं ठरलेल्या नियमांत बदल अगर अनवस्था आढळून आली तर जास्त संशोधनान्तीं कांहीं काळानें असें आढळून येतें कीं, तो बदल अगर ती अनवस्था नसून त्या काळपावेतों अज्ञात असलेल्या एका नवीन निसर्गाचे नियमांची प्रक्रिया दृष्टोत्पत्तीस आली. अशा स्थितींत मिल्ल सारख्या तत्वज्ञ बुद्धिवंतांनीं जगांतील परमाणूंच्या घटना - विघटनेची क्रिया 'आकस्मिक' 'व अंध व अप्रबुद्ध' शक्तींची लीला म्हणावी हें बुद्धीला न पटणारें व आश्चर्यकारक आहे.

पुनः Crystallography म्हणजे स्फटिक शास्त्र म्हणून एक पदार्थविज्ञानाचा भाग आहे. या शास्त्रांतील तज्ञांनीं, सूक्ष्मदर्शक यंत्राचे सहाय्यानें निरनिराळ्या खनिज द्रव्यांचें निरीक्षण करून त्यांना असें आढळलें कीं, प्रत्येक खनिज पदार्थाचे कण हे निरनिराळ्या पण विवक्षित व ठराविक आकृतींचे असतात. या आकृती भूमितींतील अत्यंत नियमबद्ध,

प्रमाणशीर, व सुंदर आकृत्यांप्रमाणें असतात. इतक्या कीं, केवळ या कणांची आकृती पाहून रुचो अगर गंध न घेतां, हा विवक्षित कण कोणत्या खनिज-द्रव्याचा आहे हें सांगतां येतें म्हणून या कणाला ते स्फटिक Crystal म्हणतात उदाहरणार्थ तुरटीचा कण किंवा स्फटिक हा actahedron म्हणजे अष्ट ( फलका ) मुखाकृती (having eight faces) असतो; मिठाचा स्फटिक ( Cube ) म्हणजे लांबी, रुंदी व उंची समान चौरस असलेला घनाकृती असतो; चुनडी किंवा लालडीचा दगड ( माणकाची एक जात ) याचा कण अगर स्फटिक हा (Rhombic Do decahedron) म्हणजे समभुज समांतर चौकोनी द्वादश (फलका) मुखाकृती असतो. हे फलक किंवा faces एकमेकांस समांतर असतात. या प्रमाणें एकंदर खनिजांचे स्फटिक, आकृतीच्या कमी अधिक सादृश्याप्रमाणें या स्फटिकांचे सात वर्ग करून एकंदर ३२ प्रकारचे असतात असें तज्ञांनीं ठरविलें आहे. या स्फटिकांचे दोन गुणधर्म मोठे चमत्कारजनक आहेत. एक धर्म असा कीं, हे स्फटिक जर फोडले, तर ते बरोबर ज्या त्यांच्या अंतर्यामांतील काल्पनिक आंसवर [axes] त्यांचे फलकांची [मुखांची] रचना झाली असेल, त्याच आंसांच्या रेषेवर फुटतात, अन्यत्र फुटत नाहींत. व असे फुटले असतां, पुनः त्याच खनिजाचे द्रवांत टाकले असतां, फुटलेला भाग नेमका पूर्ववत भरून येऊन, सबंध स्फटिक ठराविक आकृतीचा पुनः बनतो. वर सांगितलेली स्फटिकांच्या अंतर्यामांतील आंसांची आखणी कीं, ज्यांच्यावर बाहेरील फलकांची रचना होती, ती कशी होते हें शास्त्रज्ञांना कळत नाहीं. या बद्दल वर उल्लेख केलेलें प्रो. टिंडॉल दुसऱ्या एका प्रसंगानें म्हणाले:

"Atom is thus added to atom and molecule to molecule, not boisterously or fortuitously, but silently and symmetrically and in accordance with

laws more rigid than those which guide a human builder, when he places his bricks and stones together." (Manchester Science Lectures, Sixth Series, page 148.)

अर्थ—एखादा मानवी शिल्पकार अगर गवंडी, आपल्या विटा व दगड एकांवर एक ज्या शिल्पशास्त्रांच्या नियमांना धरून रचतो, त्या नियमाहूनही अधिक शास्त्रीय अशा नियमांन्वयें, कांहींही गडबड अगर धडपड न करितां अत्यंत शांतपणानें व अत्यंत प्रमाणबद्धतेनें अणूवर अणू व परमाणूवर परमाणू रचिला जातो; व रचनाकाराला ते 'atomic architect' म्हणजे 'परमाणूंचा विश्वकर्मा' या नांवानें संबोधितात. हे स्फटिक जेव्हां त्या त्या खजिन द्रव्याचें द्रवस्वरूप बदलून घनीभवनाची क्रिया चालली असते त्या वेळीं बनत असतात. व हे बनत असतांना त्यांची बनावट पाहत असतां प्रो. टिंडाल म्हणतात : "Crystals grow before you like sprouting ferns, exhibiting forms as wonderful as if they had been produced by the play of Vitality itself. I have seen these things hundreds of times, but I never look at them without wonder."-"It runs as if alive, into the most beautiful forms."

अर्थ—"हे स्फटिक तुमच्या डोळ्यांसमोर पहातां पहातां एखाद्या वेलीच्या अंकुरांसारखे वाढत वाढत जातात व असे वाढतांना त्यांचे अनेक चमत्कृतिजनक आकार बनत जातात व मग असें वाटतें कीं, यांच्या या आकारांची बनावट प्रत्यक्ष जीवनशक्तीच्या लीलेनेंच चालली आहे कीं काय. या गोष्टी मी शेंकडों वेळा डोळ्यांनीं पाहिल्या आहेत व प्रत्येक

वेळीं मी आश्चर्यानें चकित झाल्याशिवाय राहिलों नाहीं."–" हें स्फटिक जणुं एखाद्या जिवंत प्राण्याप्रमाणें उत्तम उत्तम सुंदर रूपांनीं नटत असतात." अखेरीस हे पंडित, हीं निर्जीव म्हणून समजल्या जाणाऱ्या खनिजांचे स्फटिकांची सुंदर व ठराविक रचना पाहून दिङ्मूढ होत्साते उद्गारतात कीं, "In my ignorance of it, all I have asked myself is whether there is no power, being or thing, in the Universe, whose knowledge of that of which I am so ignorant is greater than mine." "यासंबंधीचें माझें अज्ञान लक्ष्यांत घेऊन, मी माझ्या मनाला जें विचारलें आहे तें हें कीं, ज्याबद्दल माझें इतकें गाढ अज्ञान आहे, तत्संबंधीं जिचें ज्ञान, माझे ज्ञानापेक्षां अधिक मोठें आहे, अशी एखादी वस्तु, शक्ति अगर विभूती या जगांत नाहीं काय?" त्यांचें अखेरचें म्हणणें पहा:—

"Everywhere throughout, we notice this tendency of ultimate particles of matter to run into symmetric lines. The very molecules seem instinct with a desire for union and growth......From the processes of crystallisation which you have just seen, you pass by almost imperceptible gradations to the lowest vegetable organisms and from these through higher ones to the highest."

अर्थ—"आपल्या या भूगोलावर सर्व ठिकाणीं जडाच्या अंतिम परमाणूंमध्यें या प्रमाणशीर पद्धतीनें वाढण्याची प्रवृत्ती आपणास दिसून येते. या परमाणूंच्या अंतर्यामामध्यें संयोग व वाढ करण्याची जणूं वासनाच वसत आहे. घनीभवनाच्या ज्या प्रक्रिया तुम्हीं आतांच पाहिल्या, त्यां-

पासून पुढें पुढें आपण अगदीं नकळत तऱ्हेनें उद्भिजांच्या प्रथम खालच्या कोटींत, मग जास्त वरच्या, व अखेरीस अत्युच्च कोटींपर्यंत जाऊन पोंचतों."

प्रो. टिंडॉल यांना सूक्ष्मदर्शक यंत्रांच्या सहाय्यानें निरनिराळ्या फुलांच्या पांकळ्या हलकें हलकें फुलत फुलत अखेरीस त्यांच्या टोकांना वेलबुटींचा आकार कसा येतो हें दाखविण्याची फार हौस वाटे. याप्रमाणें प्रो. टिंडॉलसारख्या जडवाडी पंडिताची बुद्धी व वृत्ती स्फटिकांचे अभ्यासानें, आश्चर्यानें गुंग होऊन जगांतील निर्जीव समजल्या जाणाऱ्या खनिजामध्यें व वनस्पतीमध्यें चैतन्यप्रवण कशी होत असे हें आपण पाहिलें, व हें पाहून प्लेटोनें म्हटल्याप्रमाणें 'God geometrises' ईश्वरानें जगाची रचना भूमितीशास्त्राच्या तत्त्वाप्रमाणें केली आहे हें आपल्या प्रत्ययाला येतें.

वनस्पतीमध्यें तर एकाच भूमीमध्यें एकाच परिस्थितींत वाढणाऱ्या गवताच्या काडीपासून तों असंख्य व नानाविध वेली, वल्ली व वृक्षांपर्यंत दिसून येणाऱ्या फुलांच्या, पानांच्या व फळांच्या; फुलांच्या पाकळ्यांच्या व तुऱ्यांच्या, नानाविध पण ठराविक व विवक्षित आकृती, रुची, गंध व रंग व त्यांचे सहस्रावधी प्रकार व छटा पाहिल्या म्हणजे निसर्गांतील या सृष्टीचे भागांत किती नियमबद्धता, किती एकरूपता व किती सौंदर्य भरलें आहे, तें पाहून मन थक्क होतें व जेथें एकरूपता, सौंदर्य व नियमबद्धता आहे, तेथें (fortuitousness) आकस्मिकपणा अंध व अप्रबुद्ध [blind and unconscious] शक्तींची लीला असणें हें अशक्य कोटींतलें असून या सर्व ठिकाणीं बुद्धिमत्ता व संकल्प [intelligence and design] यांचें साम्राज्य आहे असें स्पष्ट रीतीनें प्रतीत होतें. मानवासारखा बुद्धिमान प्राणीसुद्धां जेव्हां रेखाकला व चित्रकला यांचा अभ्यास करीत असतो व निसर्गांतील नानाविध पदार्थांचे आकृतींची व रंगांचीं नक्कल करीत असतो, तेव्हां त्याला किती कष्ट पडतात व किती चुका

त्याचे हातून होतात. हें लक्षांत घेतलें म्हणजे प्रो. टिंडॉल यांनीं वरील एका अवतरणांत काढलेले उद्गार आठवतात व ही सर्व वनस्पतींतील रचना किती सावकाश व शांतपणानें, कांहीं एक गडबड अगर धडपड न होतां अखंड व बिनचूक कशी चालली आहे हें पाहून या रचनेपाठीमागें असलेल्या बुद्धिमत्तेच्या विचारानें माणुस स्तब्ध होऊन जातो.

हाच चमत्कार प्राण्यांचे व विशेषतः मानवाचे देहांचे रचनेचें निरीक्षण केलें असतां जास्तच आश्चर्यकारक होतो. म्हणून देहरचनेंतील कांहीं बाबी आपण अवलोकनांत आणूं. ज्याप्रमाणें एखाद्या इमारतीवर वारा, पाऊस व ऊन यांचे माऱ्यानें त्या इमारतींतील विटा व चुना निखळतां निखळतां खालीं पडतात त्याप्रमाणें माणसांचें हातून नित्य, बोलण्याचालण्याची व विचारांची जी क्रिया व उद्योग चालत असतो त्या योगें त्याच्या शरीरांतील निरनिराळ्या अवयवांच्या पेशी (Cells) जीर्ण होऊन स्थानभ्रष्ट होऊन, बाजूनें वाहिन्यांतून वाहत असलेल्या रक्तांत मिसळतात; हीच क्रिया एकसारखी चालेल तर कांहीं काळानें सर्व शरीर घटत घटत ५।७ वर्षांत मृत होईल; पण हा प्रसंग येत नाहीं व आपण मानव शरीर ५०।६०।१०० वर्षांपर्यंत टिकलेलें पाहतों. कारण शरीरांत रुधिराभिसरणाची योजना आहे. कांहीं पेशी जीर्ण होऊन स्थानभ्रष्ट होत असतात. तर पुनः शरीरांत अभिसरण पावत असलेले रक्त त्या पेशींचे जागीं जाऊन नवीन पेशींचा पुरवठा होत असतो. वर लिहिल्याप्रमाणें जीर्ण पेशी नित्य रक्तांत मिसळत असतात व त्यामुळें दर क्षणाला रक्त, जास्त जास्त दूषित व घाण होत असते. पुन्हां, हीच क्रिया सतत चालत राहिली तर शरीरांतील सर्व रक्त कांहीं काळानें घाण होऊन घट्ट होईल व माणसाला मधुमेही रोग्याप्रमाणें प्रथम मूर्छा (Coma) येईल व कांहीं काळानें मृत्यु येईल. पण हा प्रसंग येत नाहीं. कारण शरीरांत फुप्फुसांची योजना आहे. श्वासोच्छ्वास क्रियेनें बाहेरील शुद्ध हवा आंत नेली जाते व शुद्ध हवेंतील प्राणवायूनें रक्तांत

पडलेल्या जीर्ण पेशी दग्ध होऊन बाहेर टाकल्या जातात व आंतील रक्त फिरून शुद्ध होऊन लालबुंद होते. याप्रमाणें रक्तशोधन व शुद्ध रक्ताचा पुरवठा यांची योजना वरील प्रमाणें आहे. पण एवढीच योजना असती तर शरीरांतील रक्तसंचय हा मर्यादित असल्याकारणानें कांहीं काळानें सर्व संपून गेला असतां व माणसांस नवीन रक्तउत्पादनाचे अभावी रक्त-क्षय (anaemia) झाला असतां; पण हा प्रसंग येत नाहीं. कारण शरीरांत अन्नसेवन व नवरक्तउत्पादन यांचीही योजना आहे. याप्रमाणें उद्योगामुळें, श्रमामुळें एका बाजूनें जर शरीरांतील असलेल्या पेशी निख-ळण्याची व स्थानभ्रष्ट होण्याची [Catabolism] प्रक्रिया चालत असते, तर दुसऱ्या बाजूनें नवीन रक्त उत्पन्न होऊन, जुन्यांच्या जागीं नवीन पेशी [Cells] पुरविण्याची [anabolism] प्रक्रिया चालून जिवंत शरीरांतील घडामोड [Metabolism] अव्याहत चालू राहते व शरीर जिवंत ठेविलें जातें.

अन्नसेवनाचा व अन्नपचनाचा भाग तर अत्यंत मनोरंजक व उद्‌बोधक आहे. नाकामधून छातींतलि फुफ्फुसांकडे हवा नेणारी जी श्वासनलिका [ trachea or wind pipe ] आहे तिचे द्वारां श्वासोच्छ्वासाचा भाता एकसारखा व अखंड चालूं असतो. तो क्षणभरहि थांबूं शकत नाहीं. अन्नसेवनाचे वेळीं गिळला जाणारा अन्नाचा घांस अगर प्याले जाणाऱ्या पाण्याचा घोट हा श्वासनलिकेच्या पलिकडे, तिच्या पाठीस पाठ लावून असलेल्या अन्न नलिकेंतून (asgophagus or gullet) जठरांत जावयाचा असतो. चुकून सुद्धां अन्नाचा एखादा कण अगर पाण्याचा थेंब, अलिकडच्या श्वासनलिकेंत गेला, तर जोराचा ठसका बसून प्राणांतिक अवस्था येते. अशा परिस्थितींत जिभेवरील अन्न व पाणी, श्वासनलिकेच्या पार, अन्ननलिकेंत पोंचविणें, म्हणजे फार बिकट व प्राणांतिक प्रसंग. पण हा प्रसंग टाळला जातो, घुटका घेतल्याबरोबर जिभेच्या खालच्या टोकांस

असलेली एक अस्थिप्राय ( cartilege plate ) बनलेली पट्टी श्वास-नलिकेच्या तोंडावर (glottis) तातपुरती ओढली जाते. तिच्या योगानें तें तोंड बंद होऊन, अन्नाचा घांस व पाण्याचा घोट, अन्ननलिकेंत जातो व अन्नसेवनाची क्रिया सुरक्षित चालते. ही पट्टी घशाचे बाहेर पुढें आलेल्या हाडाचे रूपानें ( ज्यास आपण कंठ-apple-म्हणतो ) दृग्गोचर होते. पण ही पट्टी घाईमुळें अगर अन्य कारणानें, जर वेळेवर श्वासनलिकेचे तोंडावर जाऊन बसली नाहीं, तर लागलीच जोराचा ठसका बसून, जीव घाबरा होतो, व 'तुझी सासू वर टांगली आहे ती पहा' असें सांगून त्या माणसास कांहीं वेळ आपली मान वर टांगून धरावी लागते. याप्रमाणें गिळलेला अन्नाचा प्रत्येक घांस व प्यालेल्या पाण्याचा घोट म्हणजे एक टळलेला अपमृत्यु होय. पण तो टाळण्याची योजना वर प्रमाणें आहे.

आतां अन्नपचनाची स्थिती पहा. शरीराचें पोषणास पांच प्रकारचें अन्न लागतें. तें पचविण्यास पांच रस व पांच भट्ट्या अशी शरीरांत योजना आहे. पहिली भट्टी, माणसाचें मुख; यांत पिष्टमय ( Starch ) अन्न पचविण्याकरितां लागणाऱ्या लालारसाची, लालापिंडापासून ( Salivary glands ) उत्पन्न करण्याची योजना; दुसरी भट्टी जठर; यांत मांसक ( Protein ) अन्न पचविण्याकरितां जठर रसाची ( Pepsin ) योजना; स्निग्ध ( fats ) अन्न पचविणारा पित्तरस व तो उत्पन्न करणाऱ्या यकृत पिंडाची ( liver ) योजना; ही तिसरी भट्टी होय; स्वादुअन्न ( sugars ) पचविणारा स्वादुरस ( pancreative juice ) व तो निर्माण करणारा स्वादुपिंड ( pancreas or sweet bread ); ही चवथी भट्टी आहे व इतर अन्न पचविणारा आंत्ररस ( intestinal juice ). याप्रमाणें शरीरांतील कोणतीहि प्रक्रिया पाहिली असतां, विवक्षित परिणाम अगर हेतु साधण्याकरितां शरीरयात्रा चालण्याकरितां प्रत्येक ठिकाणीं असलेली योजना पाहून त्या त्या ठिकाणीं बुद्धिमत्ता ( intelligence ) व संकल्प,

सहेतुकता ( design ) यांचें वास्तव्य हटकून व स्पष्ट तऱ्हेनें गोचर होतें, व म्हणूनच निसर्गातील या सहेतुकतेबद्दल प्रत्यक्ष जॉन स्टुअर्ट मिल्ल यांनीं उत्तरवयांत विचाराच्या जास्त परिपक्व स्थितींत काढलेले उद्गार पहा :—

"The adaptations in Nature afford a large balance of probability in favour of Creation by intelligence.........Whatever ground there is, revelation apart, to believe in an Author of Nature is derived from appearances in the Universe. Their mere resemblance to the works of man or to what man can do, if he had the same power over materials of organised bodies, which he has over materials of a watch, is of some value, as an argument of analogy; but the argument is greatly strengthened by the properly inductive considerations, which establish that there is some connection through Causation between the origin of arrangements of nature and ends they fulfil; an argument which is in many cases slight; but in others and chiefly in the nice and intricate combinations of vegetable and animal life, is of considerable strength" (Mill's "Three Essays on Religion" R. P. A. page 75.)

अर्थ - "निरनिराळ्या परिस्थितीला तोंड देण्याकरितां, निसर्गात ज्या योजना दिसतात, त्यांवरून निसर्गातील निर्मितींत बुद्धिमत्तेचा उपयोग झालेला

आहे हें पुष्कळच प्रमाणांत संभवनीय दिसतें......श्रुतिशास्त्र [बायबल वगैरे सारखे धर्मग्रंथ] बाजूला ठेविलें तर, निसर्गाला कोणी निर्माता आहे असें मानण्यास जीं कांहीं कारणें असतील, तीं सर्व जगांत जी वस्तुस्थिती अवलोकनांत येते, तिजवरून अनुमानण्याचीं आहेत. मानवानें निर्माण केलेल्या पदार्थांचें साम्यावरून किंवा एखादें घड्याळ तयार करीत असतांना घड्याळाचे घटकसामानावर जी हुकमत घड्याळ करणाराची असतें, तितकीच हुकमत जर निसर्गातील निरनिराळ्या प्राण्यांचीं शरीरें बनविण्यांत त्याला असती, तर त्यानें जीं शरीरें निर्माण केलीं असतीं, त्यांचें साम्यावरून निघणारें उपमान प्रमाण, याची कांहीं तरी किंमत आहेच आहे. परंतु निसर्गातील निरनिराळ्या योजना व जे हेतु साध्य करण्याकरितां त्या उत्पन्न केल्या आहेत, यांच्यामध्यें जर योग्य अशा तर्कशास्त्राच्या प्रक्रियांनीं कार्यकारण संबंध दाखवितां व प्रस्थापित करितां आला, तर याच उपमान प्रमाणाचें महत्व पुष्कळच बळावेल. कांहीं बाबतींत हें प्रमाण जरी विशेष जोरदार असें आढळून येत नाहीं, तरीं इतर व विशेषतः वनस्पतींचे व प्राण्यांचें जीवनांत, ज्या सूक्ष्म व गुंतागुंतीच्या योजना आढळून येनात, त्यांत हें उपमान प्रमाण चांगलेंच बलवान असें बुद्धीला प्रतीत होतें."

याप्रमाणें शास्त्रज्ञ व विद्वान पंडित व तत्वज्ञ यांची जी या विषयाबाबत दुसरी विचारपद्धती, ती किती अपुरी, सदोष. व असमाधानकारक आहे, याचा येथवर विचार झाला.

आतां तिसरी विचारपद्धती. ही कांहीं वेदांती म्हणून म्हणविणारांची होय. त्यांच्या मतें जीवनाचा हेतु 'सुख' होय. ते म्हणतात, प्रत्येक जीव प्रत्येक माणुस सुखाचे पाठीमागें लागला आहे, म्हणून जीवनाचा हेतु सुख आहे. आतां प्रत्येक माणुस हा सुखाचे पाठीस लागला आहे, हें म्हणणें खरें आहे. पण प्रत्येक माणुस सुखाचे पाठीमागें आहे, हें म्हणणें निराळें व सुख हाच जीवनहेतु आहे, हें म्हणणें निराळें. कारण सुख हाच जीवनहेतु आहे

हें जर खरें असेल, तर जीवनाच्या प्रक्रियेंत दुःखाची किंवा इतर कोणत्याही स्थितीची उत्पत्ती होतां उपयोगी नाहीं; दुसरी स्थिती उत्पन्न होणें शक्य असतां कामा नये. जर असेल, तर सुख हा जीवनहेतु आहे हें म्हणणें अवास्तव व दोषास्पद आहे. जीवनाचें जर आपण अवलोकन केलें तर नुसत्या सुखानेंच अन्वित असें कितीकांचें जीवन आहे ? बहुतेकांचें जीवन तर सुखदुखःमिश्रच आहे व त्यांतही 'सुग पाहतां जवापाडे । दुःख पर्वता एवढें ॥ असें तुकाराम महाराजांचें वचन आहे. कांहीं मानवांचें जीवन तर आजन्म रोग व व्याधींनीं, दारिद्र्यानें, हालअपेष्टांनीं, ग्रस्त दिसतें. त्यांना सुखाचा लेश सुद्धां नाहीं. त्यांना सुख हा जीवनाचा हेतु आहे असें सांगितलें, तर ते काय म्हणतील ? पण तत्वज्ञानाचे व तर्काचे दृष्टीनें, जो जीवनहेतु असेल, असें म्हणावयाचें, त्या व्यतिरिक्त जर अन्यस्थिती प्रतीत होत असेल, तर तें विधान कसें टिकेल, तें सदोष असलेंच पाहिजे. असो. येथपर्यंत आपण तीन विचारपद्धती पाहिल्या; आतां चौथी विचारपद्धती पाहूं. ही सर्वांत जास्त निरीक्षण-विचार-परिप्लुत, अतएव सर्वांत जास्त निर्दोष अशी आहे. या विचारपध्दतीच्या पुरस्कर्त्याचें म्हणणें असें. माणसाच्या अंतःकरणाचें परीक्षण केलें तर त्याचे अंतर्यामांत तीन शक्ति आहेत असें आढळतें. त्या तीन शक्ति म्हणजे एक क्रियाशक्ति [ action ]; दुसरी ज्ञानशक्ति [ Cognition ]; व तिसरी इच्छाशक्ति [ Conation ]; या तीन शक्तींचे अस्तित्वाबद्दल पाश्चिमात्य मानसशास्त्रज्ञांतही मान्यता आहे. ते त्यांचा Intellect, will, feeling वगैरे निरनिराळ्या नामाभिधानांनीं उल्लेख करितात. पण तीन शक्ती आहेत याबद्दल वाद नाहीं. याच तीन शक्तींची प्रक्रिया, आपल्या भोंवती अखिल विश्वांत दिसून येते. त्यापैकीं कांहीं भाग आपण दुसऱ्या विचारपध्दतीचें अवलोकन करतांना खनिजांत, वनस्पतींत, व प्राण्यांचे शरीरांत, कसा आहे तो पाहिला. ज्योतिषशास्त्राचे अध्ययनांत सूर्य, ग्रह, उपग्रह, तारामंडळें, तेजोमेघ

(Nabula) व सूर्यमाला, यांचें निरीक्षण करतांना, ग्रहांच्या, उपग्रहांच्या सूर्याच्या, रचनेंत व ठरीव गतींत व कक्षांतूनही हा भाग आढळून येईल. तसेंच रसायनशास्त्राच्या अध्ययनांत (molecule) अणु, रेणु, परमाणु (atom) यांचें रचनेंत व भ्रमंतींतही दिसून येईल. याप्रमाणें माणसांचे अंर्यतामांत ज्या या तीन शक्ती आहेत त्यांचें केंद्रास म्हणजे या शक्तिसमुच्चयासच वेदांताचे परिभाषेंत आत्मा म्हटल्यास चालेल व यां तीन शक्तींना अनुक्रमें सत् (action) चित् (Cognition) व आनंद (Conation) असें त्या परिभाषेंत संबोधितात. या परिभाषेप्रमाणें एका व्यक्तिगत देहांत क्रिया करणाऱ्या या शक्तिमय-केंद्राला जीवात्मा म्हणतात व याच शक्तींची क्रिया आपण अखिल विश्वांत पाहूं लागलों, तर सामुदायिक (Cumulative) दृष्टीनें त्याच शक्तिमय केंद्रास विश्वात्मा किंवा परमात्मा म्हणतात. आतां या विचारपध्दतीचे पुरस्कर्त्यांचे म्हणणें असें कीं, माणुस कोणत्याही परिस्थितींत असला म्हणजे सुखाच्या अगर दुःखाच्या, श्रीमंतीच्या अगर दारिद्र्याच्या, ज्ञानाच्या अगर अज्ञानाच्या, यशाच्या अगर अपयशाच्या, कोणत्याही परिस्थितींत असो, दर क्षणाला त्याचा-म्हणजे त्याच्या अंतर्यामांतील वर सांगितलेल्या तीन शक्तींचा-म्हणजे आत्म्याचा एकसारखा विकास, उत्क्रांती, उत्कर्ष, वाढ, Growth, unfoldment, Evolution चालली आहे. जीवनाची प्रक्रिया म्हणजेच उत्क्रांती अगर विकास होय व हाच त्याचेच नव्हे तर खनिज, वनस्पती, पशु, पक्षी वगैरे सर्व प्राणिमात्रांचा जीवनाचा हेतु आहे.

आतां या विचाराचें परीक्षण आपण निरीक्षण, प्रयोग व अनुमान या सर्वसंमत पध्दतींनेंच करूं. माणसाचे जीवनाचे अगदीं सामान्य स्वरूप पाहिलें तर असें दिसेल कीं, त्याला कालाकालानें क्षुधा व तृषा पुनः पुनः लागतात. त्या भागविण्याकरितां त्याला उद्योग करून अन्नपाणी मिळवावें

लागतें. हा उद्योग करीत असतांना व तो सफल करण्याकरितां त्याच्या बुध्दीचा त्याला उपयोग करावा लागतो. या उद्योगांत त्याची क्रियाशक्ती व ज्ञानशक्ती विकास पावते व जीवन कलह जों जों तीक्ष्ण, म्हणजे निर्वाहाचीं साधनें जितकीं दुर्मिळ व दुःसाध्य, तितका उद्योग जास्त व बुध्दीस व्यायाम जास्त. अर्थांत विकासही जास्त. ही विकासाची बाजू पशु-पक्षी यांनाही आहे. त्यांच्यांत उंदीर-मांजर, व्याघ्र-हरीण, या उदाहरणांत उंदीर-हरीण यांचे सारख्यांना पळून निसटून कसें जावें यांत, तर मांजर-व्याघ्र यांच्या सारख्यांना शिकार कशी पकडावी या योजनेंत, क्रियाशक्तीचा तसाच बुध्दिमत्तेचा विकास होतो. वनस्पतींनाही जेथें पाणी असेल तेथपर्यंत मुळया विस्तारण्यांत तर ऋतुकालांतील, सूर्यताप, वाऱ्याचा मारा, शीतोष्णतेचे प्रसंग वगैरेंनीं येणाऱ्या अनुभवांनीं व कैक वर्षे त्याच अनुभवांच्या पुनरावृत्तींनी या शक्तींचा, स्थूल दृष्टीनें अव्यक्त पण बीजरूपानें उत्तरोत्तर विकास होत असतो.

माणसाचा उद्योग या क्षुधा-तृष्णा शमन करण्यापुरताच मर्यादित नाहीं. त्यांच्या अंतःकरणांत शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधादि विषयांच्या, निरनिराळ्या इंद्रियांच्या वासना, नेहमीं उदय पावत असतात. यांचें कमी-अधिक शमन झाल्यावर दारेषणा, वित्तेषणा, लोकेषणा सारख्या दुसऱ्या सहस्रावधी सूक्ष्म सूक्ष्म व बहुत गुंतागुंतीच्या वासना आहेत. त्यांची संपादणी करतांना तर, त्याच्या प्रचंड उद्योगानें त्याचे क्रियाशक्तीस व बुध्दिमत्तेस अखंड व अपरंपार व्यायाम मिळून, त्याचे कर्तृत्व व बुद्धि ही विलक्षण वर्धमान होतात व विकास पावतात. आज जगतीतलावर जीं आपल्याला असंख्य राज्यें व साम्राज्यें, समाज व संस्कृती, ज्ञान-विज्ञान शास्त्रें उदय पावलेलीं दिसत आहेत, तो सर्व या वर सांगितलेल्या वासना, इच्छा, ईषणा, यांचे तृप्त्यर्थ मानवानें केलेला प्रचंड उद्योग होय व त्यायोगें आज आपण वरील संस्थांचे रूपानें पाहत असलेला त्याचे कर्तृत्वाचा

व बुध्दिमत्तेचा विकास होय. पण या विकासांत अजून एका शक्तीची भर पडावयाची असते. तिचा प्रकार असा.

माणुस आपल्या वासना तृप्त करण्याकरितां जेव्हां उद्योग करितो तेव्हां त्याचें कर्तृत्व व बुद्धिमत्ता हीं वाढतच असतात. त्यांस अपयश आल्यास एक तर त्याचा उद्योग कांहीं काळ थांबतो; तर कांहीं वेळानें यश येईपर्यंत चालू राहतो; व त्याचें कर्तृत्व व बुध्दिमत्ता वाढतच असतात. पण यश आल्यावर सुध्दां त्यानें कमावलेली संपत्ती, विषय, वगैरे दुसऱ्यांच्या मत्सराचे, क्रोधाचे, द्वेष्याचे, विरोधाचे विषय होतात. मग तें सुरक्षित ठेवण्याकरितां त्याला कांहींतरी परार्थ (altruism) अंगीकारावा लागतो. याप्रमाणें त्याच्या अगदीं निर्भेळ व नागड्या स्वार्थाला (naked and unstinted selfishness) ज्ञानयुक्त (enlightened selfishness) स्वार्थाचें नाखुषीनें स्वरूप द्यावें लागतें. तसेंच विषय संपादन झाले तरी त्यांचे उपभोगानें व सेवनानें त्याचे शरीर कृश व जीर्ण होत जातें "भोगा न भुक्तः वयं एव भुक्ताः" आम्ही विषय भोगले नाहींत तर विषयांनींच आम्हांला भोगून टाकलें [खाल्लें]" असा भर्तृहरीच्या उक्तीचा अनुभव येतो व मग

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ गीता ६–१७

आहार युक्त कोणता व कसा, विहार युक्त कसें व कोणतें, युक्त चेष्टा–कर्में कशी करावीं, युक्त निद्रा–जाग्रण किती व कसें, हा विचार करावा लागतो. याप्रमाणें स्वार्थाला परार्थाचे रूप व आहारविहारादि, शरीरसंभोग व्यापारांना युक्ततेचें व संयमनाचें रूप द्यावें लागतें. म्हणजे नुसत्या प्रेय-प्रिय-सुखाचें काय व कोणते एवढ्या विचारानें भागत नाहीं असा अनुभव येतो. प्रेयाबरोबर श्रेयाचा, म्हणजे कायमचे सुखाचें कोणतें,

याचा विचार करावा लागतो. याप्रमाणें प्रेयास श्रेयाची जोड झाली म्हणजे इतके दिवस जो नुसत्या कर्तृत्वाचा, बुध्दिमत्तेचा व इच्छाशक्तीचाच विकास चालला होता, त्यांत परार्थाचा, निस्वार्थतेचा, युक्तायुक्ततेचा विचार नवीन येतो. हा निस्वार्थतेचा, युक्तायुक्ततेचा विचार म्हणजेच नीतीचा व सदभिरुचीचा ( Ethical and aesthetical ) विचार आला. याचा विचार आला म्हणजे बुध्दिमत्तेला व इच्छाशक्तीला नुसत्या जोमाचा, सामर्थ्याचा, प्रखरतेचा व तीक्ष्णतेचा विचार अपुरा पडून त्यांत बुध्दिमत्तेच्या व इच्छाशक्तीच्या शुध्दतेचा विचार जास्त येऊन पडतो. याप्रमाणें कर्तृत्वालाही या शुध्द बुध्दिमत्तेचा व सात्विक इच्छाशक्तीचा नवा रंग व जोड येऊन मिळतो. याप्रमाणें कर्तृत्व, बुध्दिमत्ता, व इच्छाशक्ती यांचा विकास नुसत्या सामर्थ्याच्या व प्रमाणाच्याच दृष्टीनें होत नाहीं, तर त्या तिन्ही शक्तींना शुध्दतेची, सात्विकतेची व निस्वार्थतेची जोड मिळते.

येथपर्यंत झाला निसर्गवाद. आतां प्रयत्नवादाचा विचार पाहूं. या जीवनाच्या प्राक्रियेंत आणखी मानव निर्मित संस्कृतीची व अध्ययनाची भर पडली, म्हणजे हाच विकास जास्त जलद व शास्त्रीय पध्दतीचा होऊं लागतो. माणसांवर ज्या प्रमाणें आयुर्मर्यादेंत सुखदुःखाचे, मानापमानाचे, कर्तबगारीचे प्रसंग येतात, त्याचप्रमाणें त्याचे हातून जे अनेक शास्त्रांचे अध्ययन-अभ्यास होतात त्यायोगें त्याच्यांत विवक्षित बौद्धिक व नैतिक गुणांची भर पडते. ईंग्लंडांतील प्रसिद्ध विद्वान् पंडित लॉर्ड बेकन, 'Father of Experimental Philosophy'–'प्रायोगिक तत्वज्ञानाचा जनिता' म्हणून मोठ्या बहुमानानें ज्याला संबोधितात, यांचें एक सुंदर अर्थपूर्ण वाक्य या बाबतींत आहे. "Reading maketh a full man ; writing an exact man ; conversation a ready man. ( Bacon's Essays ) "वाच-

नानें माणुस बहुश्रुत होतो. लिहिण्यानें ठाकाठिकी येते; संभाषणानें माणुस हजरजबाबी होतो." विवक्षित उद्योगानें विवक्षित गुणांचा विकास होतो. वकीलीचा धंदा करणाऱ्या माणसांत, राजदरबारांत वागलेल्या माणसांत, हजरजबाबीपणा दिसून येतो. वकीलांमध्यें व शास्त्र पढलेल्या माणसांत, विरूद्ध प्रतिपक्षियाला कसें आडवावें हें सहज साधतें. वकीलांत व शास्त्रीमंडळींत तर्काची जास्त तीक्ष्णता दिसते; तर, न्यायाधीशांत व पंचांत, त्याच तर्कबुद्धीची जास्त शुद्धता दिसून येते. वकील विरुद्ध पक्षाला आपल्या कोटिक्रमानें निरुत्तर करतो, तर न्यायाधीश दोन्ही बाजूच्या वकीलांनीं आपापल्या पक्षाच्या फायद्याकरितां जें तर्काचें जाळें पसरलें असेल त्यांतून शुद्ध तर्काच्या आश्रयानें दोघांचे त्यांचे त्यांचे अपसिद्धांत चव्हाटयावर आणून, योग्य न्यायाकडे आपला मार्ग सुधारतो. लॉर्ड बेकन यानें वरील निबंधांत हाच विचार पुढें नेऊन इतिहास, विज्ञान शास्त्र, गणित, वगैरे शास्त्रांच्या अध्ययनानें कोणत्या विवक्षित गुणाचा विकास होतो हें दाखविलें आहे. इतिहासाचे अध्ययनानें मानव स्वभावाची जास्त ओळख होते व मागील काळांतील अनेक देशांतील मानव घटना व संस्था यांचा अभ्यास झाल्यानें, भविष्यकाळीं मानव घटनांना कोणती दिशा येईल हें पूर्वाभिग्रहण पद्धतीनें (anticipations) सांगतां येतें. गणित व विज्ञान यांचे अध्ययनानें निर्दोष विचार प्रक्रिया व चित्ताची अखंड एकाग्रता व परिश्रमशीलता हीं येतात. कार्लाइल (Carlyle) या पंडितानें genius 'अलौकिक बुद्धिमत्ता' या शक्तीची व्याख्या Infinite capacity for taking pains म्हणजे 'परिश्रम करण्याचें अमर्याद सामर्थ्य' अशी केली आहे. कारण अमर्याद परिश्रमाचे अंतींच थोर शोध लागण्यास जरूर ती चित्ताची एकाग्रता व बुद्धीची सूक्ष्मता संपादितां येते. लॉर्ड बेकननेंच आपला Novum Oragnum म्हणजे 'तर्काचें नवीन तंत्र' हा ग्रंथ अकरा वेळां लिहून काढला. डार्विन साहे-

यांनीं आपला उत्क्रांतितत्वाचा शोध प्रथम दोनशें प्रयोग स्वतःशी करून पाहिल्यावर जनतेंत प्रसिद्ध केला. उपदंशाचें टोंचीचे औषधास (injection) ६०६ या संख्येनें संबोधितात, कारण त्याच्या पाठीमागें अयशस्वी असें ६०५ प्रयोग केलें गेले होते. इतक्या दीर्घ परिश्रमांचें फळ म्हणून चित्ताची अखंड एकाग्रता दीर्घपरिश्रमशीलता (patience) व निर्दोष विचार-तर्क-बुद्धि यांचा विकास होणें साहजिक आहे. ज्याचे वर अनेक वेळां कठीण प्रसंग आले, तो माणुस, तसले प्रसंग आले असतां गोंधळत नाहीं अगर डगमगत नाहीं. म्हणूनच आपण अमक्याला चार पावसाळे जास्त गेले आहेत असें म्हणून त्याचा गौरवपूर्वक निर्देश करितों.

याप्रमाणें आपल्या दैनंदिन आयुष्याचे, उदरभरणाचे, वासनातृप्तीचे-अध्ययन-अभ्यासाचे जीवनांतील निरनिराळे प्रसंगांचे अवलोकन केलें असतां असें आढळतें कीं, आपल्या हातून घडणाऱ्या विवक्षित उद्योगानें व अभ्यासानें आपल्यांत विवक्षित गुणांचा विकास नित्य होत असतो.

'The world is older and wiser by two thousand years since Christ' 'ख्राईस्ट होऊन गेल्यावर जग दोन हजार वर्षांनीं जास्त प्रौढ व ज्ञानयुक्त झालें आहे' या म्हणण्याचा अर्थ हाच आहे. हा सर्व वर्तमान काळचा विचार झाला; जसा आपल्या जीवनाचा प्रवाह आपल्या डोळ्यांसमोर चालला आहे, त्याचे निरीक्षणानें ठरलेला हा विचार झाला.

आतां आपण याच विचाराचे सहायानें माणसाचे जन्मापूर्वीचा कांहीं विचार करतां येतो काय तें पाहूं. प्रत्येक माणसांत जन्मसिद्ध कांहीं ना कांहीं बुद्धीचे व नीतीचे गुणावगुण असतात. कांहींची स्मृती तर कांहींचें धैर्य, कांहींचा विवक्षित शास्त्राकडे कल व विशेष पात्रता, याप्रमाणें जन्मसिद्धता दिसून येते. कांहींकांना तर ['Born Leaders of men'] 'मानवांचे

जन्मसिद्ध अग्रणी' ('Born soldiers') 'जन्मसिद्ध शिपाई गडी' ('Born poets') 'जन्मसिद्ध कवि' अशा संज्ञा देतांना आपण पाहतों. इंग्लडांतील पोप कवीबद्दल He lisped in numbers and numbers came to his lips' तो बोबडे बोल बोलूं लागला, तों काव्यरूपच बोलूं लागला व त्याचे ओठांतून काव्येंच बोलली जाऊं लागलीं. नेपोलियन, श्रीछत्रपती शिवाजी महाराज यांचें जन्मसिद्ध अग्रणीत्व इतिहासप्रसिद्ध आहे. हें पाहून या विकास व उत्क्रांतिविचार पद्धतीचे पुरस्कर्ते असा सवाल टाकतात कीं, प्रत्येक माणसांत व इतिहासप्रसिद्ध लोकोत्तर पुरुषांत हे जे जन्मसिद्ध गुण येतात ते कसे, या गुणांची उत्पत्ती केव्हां व कोठें झाली? त्यांची विचारसरणी अशी : वर्तमान काळीं चालकेल्या दैनंदिन चरित्रांत आपण पाहिलें कीं विवक्षित उद्योगानें व अध्ययनानें विवक्षित गुणांचा, बौद्धिक व नैतिक शक्तीचा विकास होतो; तर मग ज्याप्रमाणें कारणांवरून आपण परिणामांची अनुमान प्रक्रिया चालवितों, त्याचप्रमाणें या ठिकाणीं आपण परिणामांवरून (Reasoning from effects to cause) कारणांकडे अनुमान प्रक्रिया चालविली पाहिजे. ज्याप्रमाणें आपण नित्य पाहतो कीं तालिमखान्यांत बैठका मारणारांच्या मांड्या मजबूत व भरदार होतात, जोर काढल्यानें छाती रुंद व उठावदार होते, जोडी फिरवल्यानें दंड पिळदार होतात. तर मग जर एखादा माणुस पाहिला व त्याच्या मांड्या भरदार, छाती रुंद व उठावदार व दंड पिळदार पाहिलें तर आपण साहजिक अनुमान काढतों कीं, यानें केव्हां तरी त्यापूर्वी तालिम केली असली पाहिजे. त्याचप्रमाणें जर एखाद्याची जन्मतः स्मरणशक्ती तीक्ष्ण दिसली, तर स्मृति तीक्ष्ण होण्यास जरूर तो पठनाभ्यास, यानें केव्हां तरी त्यापूर्वी केला असला पाहिजे, भाषणांत जन्मतांच चतुरलता व हजरजबाबीपणा दिसला तर हा अनेक भाषणप्रसंगांनीं व कोर्ट-दरबारासारख्या ठिकाणीं अभ्यास झाल्यानें आला असला पाहिजे; शौर्य, धैर्य, शास्त्रप्रवृत्ती वगैरे ते ते गुण त्या त्या प्रसंगांनीं व अभ्यासानें आले

असले पाहिजेत, व यावरून मानव जीवनाला जन्माचे पूर्वी अस्तित्व असलें पाहिजे असें अनुमान साहजीकच निघतें, 'यत्र यत्र धूमः तत्र तत्र वह्निः' धूर जर दिसतो तर तेथें अग्नीचें अस्तित्व ओघानेंच आलें. नाहीं तर ज्या गुणांचा व शक्तीचा विकास कसा होतो हें वर्तमानकाळीं निरीक्षण करून ठरविलें त्याचा उपयोग काय? गुण व शक्ति प्रत्यक्ष जर दिसतात तर त्यांचे उत्पत्तीची उपपत्ती कशी लावायची? वरच्या उपपत्तीचे विचारप्रक्रियेंत कोठें चूक आहे? 'अकारणं कथं कार्यं संसारेत्र भविष्यति' (देवीभागवत १-५-७४), या जगांत अकारण असें कार्य कसें असूं शकेल.' 'नाबीजात् जायते किंचित्' [महाभारत. शांतिपर्व २९१.] बीजाशिवाय या जगांत कांहींहि उत्पन्न होऊं शकत नाहीं. याच विचारप्रक्रियेला 'अकृत अभ्यागम' 'केल्याविना कोणतीच वस्तु उत्पन्न होऊं शकत नाहीं' असा वाद म्हणतात.

हा विचार झाला जन्मापूर्वीचा. आतां मरणानंतरचा विचार पाहूं. विवक्षित उद्योगानें व अभ्यासानें विवक्षित गुणांचा व शक्तीचा जर विकास होतो, तर मरणोत्तर काय होतें? 'शक्तीचें अमरत्व' (Conservation of force) असा एक विज्ञानशास्त्रांत सिद्धांत आहे. एकदां विकास पावलेल्या, उत्पन्न झालेल्या शक्ती नष्ट होतात काय? नष्ट होत असल्यास त्या का व्हाव्या? वेदांतांत वरील सिद्धांत 'कृतहानि' अगर 'कृतनाश' या शद्बांनीं सांगितला आहे. एकदां जें केलें, एकदां जें झालें त्याचा शक्तिरूपानें नाश होत नाहीं. या वेळीं प्लेटो या ग्रीक तत्ववेत्त्याचा विचार मनांत येतो. तो म्हणतो, जगतींतलांत आपण निरनिराळ्या घटनांचें जर अवलोकन केलें, तर आपल्याला असें आढळतें कीं, दिवस व रात्र, सायंकाळ व प्रातःकाळ, शिशिर व वसंत, शुक्ल व कृष्ण पक्ष, चैत्र व फाल्गुन, जानेवारी व डिसेंबर, याप्रमाणें कालघटनेंत, दिवसांची, मासांची, ऋतूंची, संवत्सरांची भ्रमंती अखंड चाललेली दिसते. तर मग मानव जीवनांतच मात्र, निसर्गांतील याच प्रक्रियेचें स्वरूप म्हणून, 'जन्मापासून मृत्यू' या पूर्वार्धाचें रूपानें जसें आपण

प्रत्यक्षच पाहतों, त्याप्रमाणें 'मृत्यूपासून जन्म' हा उत्तरार्ध होऊन, ही जीवन-भ्रमंती कां पुरी होत नसली पाहिजे? याच घटनेंत मात्र ती अपुरी राहून कां तुटकी राहावी हे तर्काला पटत नाहीं.

मी म्हणतों आपण जर एखाद्या नदीचे काठावर उभे असलों व डोळ्या-समोरचा नदीचा प्रवाह जर गतिमान दिसला तर त्याचा हाच अर्थ आपण समजतों, कीं ज्या अर्थी समोरचा प्रवाह गतिमान हालत आहे, त्याअर्थी पुढचा [खालचा] प्रवाहहि हालतच असला पाहिजे. त्याशिवाय समोरचे प्रवाहाला गति मिळणें शक्य नाहीं; त्याचप्रमाणें मागचा (वरचा) प्रवाहही समोरचे प्रवाहाचे जागीं येत आहे त्याअर्थीं त्यालाही गतिमान करणारे सामर्थ्य उगमांतच कोठें तरी असलें पाहिजे. याप्रमाणेंच मानव जीवन प्रवाहाचे भूत, वर्तमान व भविष्य हे तिन्ही कालप्रवाहाचे भाग आपण गतिमान पाहत आहों. प्लेटोची वरील कालभ्रमंतीची कल्पना पाहिल्यावर आतां, या लेखाचें आरंभीं आचार्यांचें जें सुंदर वचन आपण केवळ सुंदर व काव्यमय म्हणून घेतलें, त्यांत नुसतेंच सौंदर्य व काव्यच नाहीं, तर गाढ तत्वज्ञानहि आहे असें आढळून येतें.

दिनमपि रजनी सायंप्रातः शिशिरवसंतौ पुनरायातः ।
कालः क्रीडति गच्छति आयुः ॥

" दिवस गेला, रात्र आली; सायंकाळ गेला, प्रातःकाळ आला; कालाची क्रीडा चालली आहे व जीवनाचा प्रवाह वहात आहे " तीच कल्पना, तेच शब्द, तेंच तत्वज्ञान, पण जास्त सरस व हृदयंगम; कारण नित्यपठणाचे स्तोत्रांत गोड पद्यांत गुंफिलेलें; म्हणून बुद्धि व अंतःकरण या दोघांना एकदम बरोबरच हालवून सोडणारें असें ते होतात.

मानसशास्त्राचे दृष्टीनेंहि थोडा या प्रश्नाचा विचार पाहण्यासारखा आहे. व्यक्तिगत जीवनांत, माणसाला आपल्या गांवांतील नदीचा उगम

कोठें झाला; आपल्या कुटुंबाचा मूळ पुरुष कोण; आपल्या कुटुंबाचें मूळ वसतिस्थान कोठें; कधीं व कशीं स्थानांतरें होऊन हल्लींची वसति आपल्याला प्राप्त झाली; तसेंच सामुदायिक जीवनांत सुद्धां देशांतील रहिवासी कोणत्या मानव वंशाचे; कोणत्या वंशांशीं केव्हां सम्मिश्र झाले; आर्यांचें मूळ वसतिस्थान कोणतें, नव्हे मानवाचेंच आद्य वसतिस्थान कोणतें; तो कधीं व कसकसा जगाचें पाठीवर स्थानांतर करीत गेला; सृष्टीचीच उत्पत्ती केव्हां व कशी झाली; याप्रमाणें भूतकालांत प्राचीन भूतकालांत, नव्हें आदिकालाचे उदरांतच बुडी घेऊन संशोधन करण्याची त्याच्यांत उपजत बुद्धी दिसून येते. तसेंच दुसऱ्यापक्षीं माझे पुत्र-पौत्रांचे हयातीपर्यंत, मी बांधलेलें घर व मिळविलेलें वित्त कसें टिकेल; माझा देश स्वतंत्र कसा व कधीं होईल; स्वराज्य मिळाल्याशिवाय मी डोळे मिटणार नाहीं; देशाच्या स्वातंत्र्याकरितां अगर रक्षणाकरितां युद्ध पुकारलें गेलें असतां युद्धांतून परत येऊं, न येऊं, याची पूर्ण अनिश्चिती असतां सैनिकानीं घरदार, आई-बाप, मुलें बाळें, यांचा पाश तोडून तडक आनंदानें वीरगीतें गात गात कूच करीत निघणें, मृत्यु डोळ्यासमोर प्रत्यक्ष आ वासून उभा आहे, असें डोळ्यांना दिसत असतां, सेनापतीची आज्ञा सुटल्याबरोबर, आपल्या मागून आपल्या वीर बंधूना आपल्या आंगावरून जाण्यास मार्ग व्हावा म्हणून खंदक भरून काढण्याकरितां, पहिल्या सैनिकांनीं खंदकांत उड्या घेणें, जीवनाचा हेतु काय, सृष्टींतील अनेक घटनांची अखेर परिणति कशांत होणार वगैरे वगैरे भविष्य काळाचे अंतापर्यंत जाणारे, वैयक्तिक व सामुदायिक जीवनांत, मानवांचे, प्रापंचिक राष्ट्रीय व जागतिक संबंधांचे मुखांतून निघणारे उद्गार, हातून होणारे उद्योग व पुरस्कृत केलेले अभ्यास संशोधन व विवेचना, व त्यांत दिसून येणारी त्यांच्या हृदयाची तगमग, तळमळ, कुतुहल, त्यागवृत्ती, व उत्कटता हीं सर्व पाहिलीं असतां इतक्या प्राचीन भूत कालाबद्दल, तसेंच इतक्या दूरच्या भविष्यत् कालांतील भवितव्य-घटनांबद्दल इतकी तीव्र व

गाढ आत्मीयता कां असावी, असा प्रश्न उभा राहातो: व त्याचे कांहीं मानवशास्त्रवेत्ते असे उत्तर देतात कीं, वस्तुतः मानव जीवनाचा – नव्हे जीवमात्राच्या जीवनाचा प्रवाह एक व अखंड आहे. भूत –भविष्य, जन्म–मृत्यु, आप-परभाव, हे केवळ देहादि प्राकृतिक मर्यादांनीं जीवन घटनांतून दृश्यमान होणारे तात्कालीक आभास आहेत. याची साक्ष वर उल्लेखिलेली उपजत आत्मीयता होय. हीं आत्मीयता नेहमीं माणसांचे नेणिवेचे [Sub-liminal consciousness] भुयारांत खोल कोठेंतरी निद्रित असते ती वर लिहिल्याप्रमाणें वैयक्तिक व सामुदायिक जीवनांत निरनिराळ्या घटनांनीं व प्रसंगानीं उत्कट झाल्यामुळें प्रत्ययाला येते.

आतां कोणतीहि परिस्थिती असली मग ती श्रीमंतीची असो अगर गरीबीची असो, सुखाची असो अगर दुःखाची असो; मानवाचे जीवनांत विकासाचीच प्रक्रिया अखंड चालते हें विकासवाद्यांचें विधान पाहूं. निरीक्षणानें असें आढळेल कीं दुःखानें ज्ञानाचा उदय होतो. कारण दुःख झाल्याबरोबर, त्या दुःखाचें कारण काय म्हणून माणूस साहजिकच चौकशी करितो, जरुर तें अध्ययन करतो व याचा परिणाम ज्ञानप्राप्तींत होतो. म्हणूनच एका तत्वज्ञाचें वचन आहे कीं, " Had there been no death or misery in the world, there would have been no birth of philosophy ' या जगांत जर मृत्यु व आपत्ती नसत्या तर तत्वज्ञानाचा उदय झाला नसता. मृत्यु व आपत्ती हे मोठे शिक्षक गुरु आहेत. नचिकेतानें ' येयं प्रेते विचिकित्सा मनुष्ये । अस्तीत्येके नायमस्तीतिचान्ये ' ॥ अर्थ – मनुष्य मेल्यावर हा प्रश्न उत्पन्न होतो. कोणी म्हणतात तो अजून आहे; कोणी म्हणतात तो नाहीं. ' हा प्रश्न आपला तिसरा वर म्हणून मृत्यूदेवालाच विचारला म्हणून जें कठोपनिषतकारानें दाखविलें आहे, तें अत्यंत मार्मिक आहे, कारण मृत्यूनंतर काय होतें हें मृत्युदेवाला

ठाऊक नसणार तर कोणाला असणार? पण मृत्युदेवानें ही, या शिवाय दुसरें काय वाटेल तें माग, हें उत्तर देण्यांतहि तितकाच मार्मिकपणा दाखविला आहे. दुःखानें जशी ज्ञानप्राप्ती, त्याप्रमाणचें दुःखानें माणसांत तितिक्षा, सोशीकपणा उत्पन्न होतो. तिसरें, दुःखाच्या अनुभवानें दुसऱ्यां-च्याबद्दल सहानुभूति उत्पन्न होते. याच सहानुभूतीचे अभ्यासानें परांतरसिद्धि प्राप्त होते. याप्रमाणें दुःखानें ज्ञानाचा उदय, तितिक्षा, सहानुभूती, व परांतर-सिद्धी या प्राप्त होतात.

हा फायदा पाहून कांहीं लोकांना सुखाचें महत्व दृष्टीआड होतें. कुंतीनें महाभारतांत, श्रीकृष्णानीं वर माग म्हणून म्हटलें असतां ‘ विपदःसंतु नः शश्वत् ’ असें याच दृष्टीनें मागणें मागितलें. श्रीकृष्णा आम्हाला निरंतर विपन्नावस्थेंतच ठेव म्हणजे आम्हाला तुझा विसर होणार नाहीं. पण सुखा-मध्यें ही विकासाचा भाग आहे, हें विसरतां कामा नये; कारण नुसतेंच जगांत दुःख असलें तर शरीर मोडावून जाईल. शरीराला जशी तितिक्षा हवी, त्याप्रमाणें विश्रांती व आरामहि हवाच व ती विश्रांती व तो आराम सुखदास्थितींत मिळतो. म्हणून जगांत चहूंकडे द्वंद्वस्थिती आढळते. द्वंद्वांतच विकासाला अवकाश आहे. शेतांतील पिकांचे वाढीसाठीं सूर्यप्रकाश व उष्णता दोन्ही पाहिजेत, पण नुसतीच उष्णता व प्रकाश असतील, तर पिकें जळून जातील, म्हणून पर्जन्य रूपानें पाण्याची प्रतियोगी व्यवस्था योजून ठेवलेली आहे. नुसताच पर्जन्य असेल तरीहि पिकें कुजून सडून जातील. म्हणून पर्जन्य व सूर्य, ताप व प्रकाश अशी द्वंद्वात्मक योजना आहे.

श्रीमंती व दारिद्र्य यांचाहि विचार असाच आहे. दोन्ही परिस्थितींत विकास आहेच. पण विकासाचा प्रकार मात्र निराळा. श्रीमंतींत मोठा व्याप कसा आवरावा, हें साध्य होतें, संघटना शक्ती वाढते, तर गरीबींत आपल्या गरजा अत्यंत थोडक्या साधनांत कशा भागवाव्या ही कला अवगत होते.

श्रीमंतींत दातृत्वाला, परोपकाराला वाव मिळतो; तर गरीबी असून सुद्धां दात्या माणसांना स्फूर्ती देऊन, त्यांच्या तिजोऱ्या वस्तुतः आपल्याशा करितां येतात. महात्मा गांधींनीं स्वतः जरी सर्व संन्यास करून लंगोटी लाविली, तरी मोतीलाल नेहरूंना आनंदभुवनाचें स्वराज्यभुवन करण्याची स्फूर्ती त्यांनींच दिली. श्रीमंतींत निरभिमानाचा धडा शिकता येतो, तर गरीबींत संतोष व निर्मत्सर वृत्ती बाणतां येते.

बाल्य, तारुण्य व वार्धक्य यांचाही विचार असाच आहे. पुष्कळांना, बाल्य व तारुण्य यांत शरीराचा व मनाचा जोम बहुत असल्याकारणानें कर्तृत्व व बुद्धिमत्ता यांचा होणारा विकास स्पष्ट दिसतो. पण वार्धक्यांत विकास कसला, त्यांना असा संशय येतो. पण बारिक निरीक्षणानें आढळेल कीं, वार्धक्यांत कर्तृत्वाचा व बुद्धिमत्तेचा जरी विकास होत नसला तरी शरीर व मन विगलित झाल्या कारणानें, लोकांचें सहाय्याची गरज व अपेक्षा जास्त वाढते, व त्यामुळें निरभिमानता व कृतज्ञता या वृत्तींचा विकास होण्यास जास्त अनुकुल क्षेत्र उत्पन्न होतें. म्हणजे वार्धक्य हें अंतःकरणाचा विकास होण्याचा विशेष काल होय. याप्रमाणें प्रत्येक परिस्थिती व वयमान यांत विकास हा मृत्यूपर्यंत चालू असतो.

या विकासवादासंबंधीं ऐतरेय ब्राह्मण ग्रंथांत मोठा मनोरंजक उल्लेख आहे. तो या संबंधीं फार महत्वाचा आहे. तो असा "तस्य य आत्मानं आविस्तरांवेद अश्नुते हि आविर्भूयः। औषधीवनस्पतयोयच्च किंच प्राणभृतः स आत्मानं आविस्तरांवेद। औषधिवनस्पतिषु हि रसो दृश्यते। चित्तं प्राणभृत्सु। प्राणभृत्सु तु एव आविस्तरां आत्मा। तेषु हि रसोपि दृश्यते। न चित्तं इतरेषु। पुरुषे तु एव आविस्तरां आत्मा। सहि प्रज्ञातेन संपन्नतमः। विज्ञातं वदति। विज्ञातं पश्यति। वेदश्वस्तनम्। वेद लोकालोकौ। मर्त्येन अमृतं ईप्सति। एवं संपन्नः। अथ इतरेषां

पशूनां अशनापिपासे एव अभिविज्ञानं । न विज्ञातं वदंति । न विज्ञातं पश्यंति । न विदुः श्वस्तनं । न विदुर्लोकालोकौ । ते एतावंतो भवंति । यथाप्रज्ञं हि संभवाः ॥ [ऐतरेयारण्यक २. ३. २.]

अर्थः—जो मनुष्य सर्व ठिकाणीं एकाच आत्म्याचा विस्तार पाहतो, त्यालाच या जगांतील आविर्भूत झालेल्या पदार्थांचें रहस्य कळतें. औषधी वनस्पती, त्याचप्रमाणें जे प्राणवान् (प्राणी) आहेत, त्या सर्वांत एकाच आत्म्याचा विस्तार आहे. औषधि वनस्पतींच्यांत रस दृश्यमान आहे. प्राण्यांत चित्त दिसतें, प्राण्यांत त्याच आत्म्याचा जास्त विस्तार-विकास आहे. प्राण्यांत रसही दिसतो, पण प्राण्यांहून कनिष्ठांत चित्त मात्र दिसत नाहीं. मानवांत तर त्याच आत्म्याचा विकास अधिक आहे. तो (त्याच्यांत रस व चित्त असूनही) प्रज्ञा संपन्न आहे. जें जें त्याला समजतें, तें तें तो बोलून दाखवूं शकतो. जें जें तो पाहतो, तें तें त्याला समजतें, काल व उद्यां (म्हणजे भूत व भविष्य) हे कालाचे विभाग त्याला ज्ञात आहेत. दृश्य व अदृश्य सृष्टीचें ज्ञान त्याला होऊं शकतें. मर्त्य वस्तु पाहून तो अमर वस्तूंची कल्पना करून त्यांची इच्छा करतो. याप्रमाणें तो संपन्न आहे. पण इतर पशू वगैरे जे प्राणी आहेत त्यांचें ज्ञान केवळ खाण्या-पिण्यापुरतेंच आहे. त्यांना जें समजेल, तें बोलून दाखवितां येत नाहीं. जें पाहतील, तें त्यांना समजूं शकत नाहीं. भूत–भविष्य हे काल-विभाग त्यांना अवगत नाहींत. दृश्य व अदृश्य सृष्टी त्यांना ज्ञात नाहींत. ते याप्रमाणें [मर्यादित विकासाचे] आहेत. प्राण्यांत प्रज्ञेचा जितका विकास असतो, तसा त्यांना [त्या त्या योनींतून] जन्म मिळतो.

याप्रमाणें हें विकासवादाचें तत्त्व प्राचीन ऋषींना अवगत होतें, हें पाहून आश्चर्य वाटतें. वरील विवेचनावरून हें स्पष्ट आहे कीं जीवनाचा हेतु काय या प्रश्नाबाबत ज्या चार विचारपद्धतींचें आपण निरीक्षण केलें, त्या

चारींत शेवटली व चवथी जास्त निर्दोष व व्यापक अतएव ग्राह्य ठरली. कारण जीवनांत श्रीमंती अगर दारिद्र्य, सुख अगर दुःख, यश अगर अपयश, कोणतीहि परिस्थिती असली तरी मानवाचा, नव्हे जीवमात्राचा, विकास हा चाललेलाच असतो. त्याची कर्तृत्वशक्ति, त्याची बुद्धिमत्ता व त्याचें अंतःकरण यांचा विकास एकसारखा आमरणांत होत राहतो व म्हणून या विचारपरंपरेप्रमाणें, वैयक्तिक व सार्वजनिक कर्तव्यांचा भार पूर्ववयांत यथाशास्त्र व यथाशक्ती उचलून, जीवनाचा अखेरचा पल्ला गांठलेल्या सन्यासाश्रमीयाला सत्-चित्-आनंद सच्चिदानंद हाच एक जीवनमंत्र कां जपण्यास दिला जातो याचें मर्म स्पष्ट होतें. जीवन हें त्रिविध आहे. जीवनाच्या या त्रिविध अंगांचा विकास व ज्ञान संपादन करणें हेंच जीवनरहस्य होय. जीवनाचें हें त्रैविध्य हीच या ब्रह्मांडांतील मानवाचें ज्ञानाची व कर्तृत्वाची परासीमा होय.

वस्तुतः अंगीकृत विषय येथेंच संपला. पण विषय येथवर आल्यावर मग माणसाची बुद्धि व अंतःकरण येथेंच थांबून राहत नाहीं. निरीक्षण व त्यावर आरूढ असलेली तर्कबुद्धि यांचा प्रांत संपला असला तरी, 'मर्त्येन अमृतं इप्सति' या वरील ऐतरेय ब्राह्मणग्रंथांतील वचनाप्रमाणें मानवाची बुद्धी 'मर्त्य सृष्टीचें अवलोकन करून अमृत स्थितींची इच्छा करते.' कल्पना विहंगमावर आरूढ होऊन यापुढेंही अनेक विचार, सिद्धांत-स्वरूपांत मांडते.

हा विकासवाद ऐकून निरुत्तर झालेले कांहीं लोक विचारतात, 'तर मग हा विकास कोठपर्यंत जावयाचा, या विकासाची मर्यादा कोठें संपते? या प्रश्नाचें उत्तर सरूपता मुक्ती या शब्दांनीं दिलें जातें. जी कर्तृत्वशक्ती, जी बुद्धिमत्ता, व जें अंतःकरण, आपल्याला जागतिक प्रक्रियेंत दिसून येतें म्हणून ज्या केंद्राला मागें विवेचन प्रसंगीं 'परमात्मा' अगर 'विश्वात्मा' म्हणून संबोधिलें, त्याशीं हा मानव एकरूप होतो. व हा विचार 'नर

करणी करे तो नरका नारायण हो जाये ' ' ब्रह्मभूयाय कल्पते ' ' बहूनां जन्मनां अंते ज्ञानवान् यां प्रपद्यते ' ' ज्ञानी तु आत्मैव मे मतं ' ' Be ye perfect, as the Father in heaven is perfect ' वगैरे धर्मग्रंथांतील वचनांनीं प्रगट केला आहे.

येवढेंच नव्हे तर सूर्यमाला अगर ब्रह्मांडें हीं जशीं आकारांनीं उत्तरोत्तर मोठमोठीं आहेत, त्याचप्रमाणें तेथील जीवन ही, नुसतेंच त्रिविध नसून असंख्यविध आहे असा विचार आपल्या धर्मग्रंथांतून दिला आहे. पुढलि विधानें पहा.

'अस्य ब्रह्मांडस्य समंततः स्थितानि एतादृशानि अनंत कोटिब्रह्मांडतन सावरणानि ज्वलंति। चतुर्मुख – पंचमुख – षण्मुख – सप्तमुख – अष्टमुखादि संख्याक्रमेण सहस्त्रावधि मुखांतैः नारायणांशैः ........। आधिष्ठितानि महाजलौघ मत्स्य बुद् बुद् अनंत संघवत् भ्रमंति ( देवी भागवत )

अर्थ – या ब्रह्मांडाच्या भोंवतीं अशाच प्रकारचीं अनंत कोटि ब्रह्मांडें आपापल्या आवरणांसहित, प्रकाशमान अशीं लखलखत आहेत. त्याजवर चार पांच सहा सात आदि संख्या क्रमानें हजारों मुखांचे, नारायणाचे अंश ( ब्रह्मां, विष्णु, महेश ) अधिष्टित आहेत. हीं सर्व ब्रह्मांडें एखाद्या महासागरांतील मत्स्य व बुडबुडे यांच्या असंख्य समूहाप्रमाणें भ्रमण करीत असतात.

संख्याचेत् रजसां आस्ति विश्वानां न कदाचन। ब्रह्मांविष्णुशिवादीनां तथा संख्या न विद्यते। प्रतिविश्वेषु संत्येव ब्रह्मां-विष्णु-शिवादयः ॥ ( देवी भागवत ९. ३. ७ व ८ )

समुद्राच्या कांठावरील वाळूचे कण ( एक परी ) मोजतां येतलि पण ब्रह्मा, विष्णु व शिव यांची संख्या मोजतां येणार नाहीं. इतकें मात्र खरें कीं प्रत्येक विश्वागणिक ब्रह्मा विष्णु व शिव अधिष्ठोत आहेत. ( देवी भागवत ९. ३. ७ व ८ )

तेथें ब्रह्मादिकांचीं भुवनें । तेथें ब्रह्मांड देवतांचीं स्थानें ।

हे श्री समर्थांचे दासबोधांतील उध्दृत केलेलें वचन आतां सार्थ वाटेल.

पण या उत्तरामुळें सामान्य माणसाचें खरोखर समाधान होत नाहीं. नवीन प्रश्नमालिका उत्पन्न होते. कितीही असंख्यविध विकास असला, तरी परमात्मतत्वाशीं एकरूपता झाल्यावर पुढें काय ? कारण जें आज परमात्मतत्वाशीं एकरूप झालें तेंच युगापूर्वीं त्याच परमात्मतत्वांमधून भिन्न होऊन निघालें होतें. निघण्यापूर्वी त्याशीं एकरूपच होतें. व युगांतींही पण येऊन त्याशींच एकरूप झालें. तर मग पूर्णांतून भिन्नरूपानें निघून अपूर्ण झालें, व अंतीं फिरून एकरूप होऊन पूर्ण झालें. यांत मिळालें काय, या खटाटोपाचा अर्थ काय ? शंकराचार्यासारखे बुद्धिमान पुरुष हा लीला-कैवल्यवाद म्हणून सांगतात, ही त्या कैवल्याची लीला आहे. कोणी म्हणतात हा 'स्वभावस्तु प्रवर्तते' या वचनांतील स्वभाववाद आहे .समर्थ म्हणतातः

अरे जें जालें चि नाहीं । त्याची वार्ता पुससी काई ।

पण मीं आरंभीं म्हटल्याप्रमाणें हीं उत्तरें नव्हत. यांनीं समाधान होणें शक्य नाहीं. प्रश्नांना उत्तरें देण्याचा प्रयत्न करणें म्हणजे स्वस्कंधारोहणाप्रमाणें अशक्य आहे.विकासवाद ही मानवज्ञानाचे प्रत्यक्षबुद्धिवादाची हद्द झाली. निदान सध्यांच्या स्थितींत तरी ती हद्द आहे असें म्हणणें प्राप्त आहे. पण या हद्दीच्या बाहेर म्हणजे जे अतिमानव झाले अशांचें उत्तर काय आहे हे एखाद्या स्वतंत्र लेखानें पहाण्यासारखे आहे, समर्थांच्या कृपेनें जमल्यास पुढें पाहूं.

——×——

जिज्ञासूंकरितां माहिती

[ कव्हर पान २ वरून ]

व्हावयाला पाहिजेत. सद्बुद्धि असणाऱ्या माणसांचीं धर्ममतें कांहींही असलीं तरी त्या सर्वांत ऐक्य-भावना उत्पन्न झाली पाहिजे, असें त्यास वाटत आहे व धर्मसिद्धांतांचें अध्ययन करून आपण लोकांस ज्ञानदान करावें अशी त्या जिज्ञासूंची इच्छा आहे.

**सत्याचा शोध व त्या शोधाचा अर्थ :** अमुक अमुक गोष्टीवर आमची सर्वांची श्रद्धा आहे व म्हणून आम्ही या सोसायटींत आलों आहों, असें त्यांचें म्हणणें नसून **आम्हां सर्वांस सत्य जाणण्याची आवड आहे व त्यामुळेंच आम्ही या संस्थेंत एकवटलों आहों,** असें ते मानतात. अध्ययन, मनन, शुद्ध आचरण, श्रेष्ठ ध्येयाविषयीं खरें प्रेम इत्यादिक अंतस्थ साधनांनीं सत्य सांपडण्यास अनुकूल स्थिती निर्माण होते. अर्थात त्या साधनांची पराकाष्ठा करून जिज्ञासूनें सत्य हस्तगत करावें, अशी त्यांची भावना असते.

**सोसायटीचें उदार धोरण:** त्यामुळें अमुक एका सिद्धांतावर तुम्ही श्रद्धा ठेवली पाहिजे, असा कोणाशींही आग्रह धरण्याचें त्यांच्या मनांत येत नाहीं. अंतस्फूर्तीनें वा अभ्यासानें ज्ञान मिळाल्यावर आपोआप जिज्ञासूची श्रद्धा बसेल, हें जर खरें, तर कोणतेही सिद्धान्त त्याच्या गळयांत आजच घाईनें बांधण्याचें प्रयोजन नाहीं. 'बाबावाक्यं प्रमाणम्' या न्यायानें कोणत्याहि सिद्धान्तास मान डोलविण्यापेक्षां तद्विषयक ज्ञान संपादन केल्यास जी त्याबद्दल निश्चयबुद्धि वाटते तीस अर्थात् अधिक किंमत आहे. थिऑसॉफिकल सोसायटीच्या सभासदांची अशी विचारसरणी असल्यामुळें ते सर्वांशींच उदार बुद्धीनें वागतात व असें वागणें हें आपलें अवश्य कर्तव्य समजतात, हें उघड आहे. लोक अज्ञानी असतील तर त्यांचें अज्ञान घालविलें पाहिजे, त्यांस शासन करण्यांत अर्थ नाहीं, ही त्यांची भावना; प्रत्येक धर्म म्हणजे पराविद्येचें एक विशिष्ट स्वरूप ही त्यांची समजूत; म्हणून धर्माचे दोष काढीत बसण्यापेक्षां त्यांचें अध्ययन करणें, व धर्मांत श्रेष्ठ कनिष्ठ अशा प्रती लावीत बसून धर्मांतरास उत्तेजन देण्यापेक्षां प्रत्येकास आपआपल्या धर्माप्रमाणें वागण्यास सांगणें हें अधिक श्रेयस्कर होय, असें ते आपलें धोरण ठेवतात. सर्वांशीं समेट, सख्य व प्रेम हें त्या जिज्ञासूंचें ब्रीद आहे व सत्य हें त्यांचें ध्येय होय

[ कव्हर पान ३ पहा

[ पान ४० वरून ]

सर्व धर्मांच्या मुळाशीं असलेले सिद्धान्त हीच आत्मविद्या किंवा थिऑसफी. अर्थात् ते सिद्धान्त फक्त आमच्याच धर्मांत आहेत असें कोणालाही म्हणतां येणार नाहीं. आत्मविद्यांतर्गत तत्त्वज्ञानानें मानव जीविताचा प्रश्न सुटतो व प्रेम आणि न्याय हे उत्क्रान्तिक्रमाचे आधारस्तंभ आहेत हें सिद्ध होतें.

**मृत्यूचें कोडें :** जीवाच्या दीर्घ चरित्रांत देहांस अनेकवार मृत्यु येत असतो व मृत्यूच्या द्वारांतून पलीकडे गेलें म्हणजे इहलोकींच्या आयुष्यापेक्षां अधिक तेजस्वी आयुष्यक्रमाचा अनुभव माणसांस मिळतो. हें उत्क्रांतिक्रमांतील मृत्यूचें स्थान आत्मविद्येच्या अध्ययनानें माणसाच्या ध्यानांत येऊन त्याविषयींचें त्याचें भय नाहींसें होतें. मनुष्य हा आत्मा आहे आणि देह व मन हे त्याचे सेवक आहेत, ही गोष्टही आत्मविद्येनें सिद्ध होते. धर्मग्रंथ व धर्मसिद्धांत यांतील रहस्यात्मक भागही आत्मविद्येनें उघड होतात व अंतःस्फूर्तीच्या(Intuition)कसोटीप्रमाणें बुद्धीच्याही कसोटीस ते उतरूं लागतात.

**थिऑसॉफिकल सोसायटीचे सभासद** या सिद्धांतांचें अध्ययन करतात व थिऑसफिस्ट तद्वत् आचरण करण्याचा प्रयत्न करतात. अध्ययन करणें, परमतांविषयीं आदर ठेवणें, उच्च ध्येय बाळगून त्याकरितां सतत उद्योग करणें या गोष्टींची ज्यास आवड असेल, त्याचें सभासद म्हणून सोसायटी प्रेमानें स्वागत करील. पुढें थिऑसफिस्ट होणें ज्याच्या त्याच्या प्रयत्नावर अवलंबून रहाणार आहे.

जास्त माहिती करितां Federation Secretaries च्या खालीं दिलेल्या पत्त्यांवर चौकशी करा :-

१. श्री. गंगाधर रघुनाथ भडभडे, बी.ए.,एलएल.बी.
१८ गणेशवाडी, डेक्कन जिमखाना, पुणें. ४.

२. श्री. गोपाळ हरी कुंटे, ७८१ रविवार, नाशिक.

---

शुद्धिपत्र :-

| न | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५ | १७ | The Elect Humanity | The Elect of Humanity |
| ७ | १५ | creator | creation. |

## मराठी थिऑसॉफिकल फेडरेशननें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें

| | | रु. आ. पै. |
|---|---|---|
| (१) | थिऑसफीवरील सुबोध व्याख्यानें<br>भाषांतरकार दे. भ. लेले, बी. ए. | ०—६—० |
| (२) | सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय<br>लेखक वा. ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | ०--१४--० |
| (३) | हिंदु सामुदायिक पूजा (भारत-समाज-रचित)<br>ले. रा. स. भागवत एम्. ए. (ठाणें) | ०—६—० |
| (४) | ईश्वर आहे काय? (दोन जिज्ञासूं-<br>मधील संवाद)-ले. रा. स भागवत | ०—६—० |
| (५) | मृत्यूनंतर काय? (दोन जिज्ञासूंचा संवाद)<br>ले. रा. स. भागवत, एम्. ए. | ०—४—० |
| (६) | थिऑसफी म्हणजे काय?<br>ले. रा. स. भागवत, एम्. ए. | ०—४—० |
| (७) | महम्मद पैगंबर व त्यांचा इस्लामधर्म<br>ले. वा. ल. चिपळूणकर | ०—४—० |

---

| | |
|---|---|
| बेझंट-चरित्र—आवृत्ति २ री (१९४७)<br>ले. रा. स. भागवत. प्रकाशक: महाराष्ट्र ग्रंथ-<br>भांडार लि. मुंबई ४ | ५—०—० |
| राजयोगाचीं मूलतत्त्वें व अभ्यास<br>ले. रा. स. भागवत एम्. ए. प्र. महाराष्ट्र ग्रंथ<br>भांडार लि. मुंबई | ३—०—० |
| भारतीय संस्कृति व आपण (तरुणां-<br>करितां) ले. रा. स. भागवत. प्र. प्रभा गर्दे,<br>एम्. ए., जुनी सांगली—सांगली | ०—८—० |
| जीवन आणि कला- श्री. जिनराजदास<br>(अध्यक्ष थि. सोसायटी) यांच्या लेखांचा अनुवाद;<br>ले.-दे. भा. लेले; प्र. महाराष्ट्र ग्रंथ-भांडार लि. मुंबई. | ३--०--० |
| मृत्यु व मृत्यूनंतर—ले. रा. स. भागवत, एम्. ए.<br>प्र. अ. अ. कुळकर्णी, कांटिनेंटल प्रकाशन,<br>टिळक रोड, पुणें २ | १—८—० |